N.A.

Shri Shivalilamritam

श्रीशिव लीलामृतं

Marathi

Paper - Printed

1885 San

115 Folio

9.6" X 6.6"

Incomplete

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीसांबसदाशिवायनमः ॥ ओं नमोजीशिवाअपरिमिता ॥ आदिअनादिमायातीता ॥ पूर्णब्रह्मानंदशाश्वता ॥ हेरंब ताताजगद्गुरू ॥ १ ॥ ज्योतिर्मयस्वरूपापुराणपुरुषा ॥ अनादिसिद्धाआनंदवनवि- लासा ॥ मायाचक्रचालकाअविनाशा ॥ अनंतवेषाजगत्पती ॥ २ ॥ जयजयविरूपाक्षा पंचवदना ॥ कर्माध्यक्षाशुद्धचैतन्या ॥ विश्वंभराकर्ममोचकगहना ॥ मनोजदहनमन- मोहनजो ॥ ३ ॥ भक्तवत्सलभतूंहिमनगजामात ॥ भाललोचननीलग्रीवउमानाथ ॥ मस्त कींस्वर्धुनीविराजित ॥ जातिसुमनहारवतजी ॥ ४ ॥ पक्षिरथप्रियत्रिपुरांतक ॥ यक्षपति मित्रप्रतापार्क ॥ दक्षमखविध्वंसकमृगांक ॥ निष्कलंकतवमस्तकीं ॥ ५ ॥ विशालभाल कर्पूरगौरवर्ण ॥ काकोलभक्षकनिजभक्तरक्षण ॥ विश्वसाक्षीभस्मलेपन ॥ भयमोच कभवहारकजो ॥ ६ ॥ जोसर्गस्थित्यंतकारण ॥ त्रिशूलपाणीशार्दूलचर्मवसन ॥ स्कं दताततसुहास्यवदन ॥ मायाविपिनदहनजो ॥ ७ ॥ जोसच्चिदानंदनिर्मळ ॥ शिवशांतज्ञा नघनअचळ ॥ जोभानुकोटितेजअढळ ॥ सर्वकाळव्यापकजो ॥ ८ ॥ सकलकलिमलदह नकल्मषमोचन ॥ अनंतब्रह्मांडनायकजगद्रक्षण ॥ पद्मजताततमनरंजन ॥ जननमरण नाशकजो ॥ ९ ॥ कमलोद्भवकमलावर ॥ दशशतमुखदशशतकर ॥ दशशतनेत्रसुरभूसुर,

अहोरात्रध्यातीजया ॥ १० ॥ भव भवांतक भवानीवर ॥ स्मशानवासी गिरागोचर ॥ जो स्वर्धुनीतीरविहार ॥ विश्वेश्वर काशीराजतो ॥ ११ ॥ व्योमहरणव्यालभूषण ॥ जोगजमद नअंधकमर्दन ॥ ओंकारमहाबलेश्वरआनंदघन ॥ मदगर्वभंजनअजअजितजो ॥ १२ ॥ अमितभर्गनिगमागमनुत ॥ जोदिगंबरअवयवरहित ॥ उज्जयनीमहाकालकालातीत ॥ स्मरणेंकृतांतभयनाशी ॥ १३ ॥ दुरितकाननवैश्वानर ॥ जोनिजजनचित्तचकोरचंद्र ॥ वेणूनृपवरमहत्पापहर ॥ घृष्णेश्वरसनातनजो ॥ १४ ॥ जोउमाहृदयपंजरकीर ॥ जोनिजजनहृदयाब्जभ्रमर ॥ तोसोमनाथशशिशेखर ॥ सौराष्ट्रदेशविहारीजो ॥ १५ ॥ कैरवलोचनकरुणासमुद्र ॥ रुद्राक्षभूषणरुद्रावतार ॥ भीमभयानकभीमाशंकर ॥ तपापारनाहींज्याच्या ॥ १६ ॥ नागदमननागभूषण ॥ नागेंद्रकुंडलनागचर्मपरिधान ॥ ज्योतिर्लिंगनागनाथनागरक्षण ॥ नागाननजनकजो ॥ १७ ॥ वृत्रारिशत्रुजनकवरदायक ॥ बाणवल्लभपंचबाणांतक ॥ भवरोगवैद्यत्रिपुरहारक ॥ वैजनाथअत्यद्भुतजो ॥ १८ ॥ त्रिनयनत्रिगुणातीत ॥ त्रितापशमनत्रिविधभेदरहित ॥ त्र्यंबकराजत्रिदोषानलशांत ॥ करुणाकरबलाहकजो ॥ १९ ॥ कामसिंधुरविदारककंठीरव ॥ जगदानंदकंदकृपार्णव ॥ हिमनगवासीहैमवतीधव ॥ हिमकेदारअभिनवजो ॥ २० ॥ पंचमुकुटमायामलहरण ॥ निशिदिनगातीआम्नायगुण ॥

नाहींजयाआदिमध्यअवसान॥मल्लिकार्जुनश्रीशैलवासी॥२१॥जोशक्रारिजनकांतक प्रियकर॥भुजासंतापहरणजोडोनिकर॥तेथेंतिष्ठतअहोरात्र॥रामेश्वरजगद्गुरू॥२२॥ ऐसियाशिवासर्वोत्तमा॥अजअजितब्रह्मानंदधामा॥तुझ्यावर्णावयामहिमा॥निग मागमाअतर्क्य॥२३॥ब्रह्मानंदह्मणेश्रीधर॥तवगुणार्णवअगाधथोर॥तेथेंबुद्धिचित्त तर्कपोहणार॥नपावतीपारतत्वतां॥२४॥कनकाद्रिसहितमेदिनीचेंवजन॥करावया- ताजवाआणूंकोठुन॥व्योमसांठवेसंपूर्ण॥ऐसेंसांठवणकोठूनआणूं॥२५॥मेदिनीवस नाचेंजळआणिसिकता॥कोणत्यामापेंमोजूंआतां॥प्रकाशावयाआदित्या॥दीपसर ताकेंविहोय॥२६॥धरित्रीचेंकरूनिपत्र॥कुधरकज्जलजलधीमषीपात्र॥सुरद्रुमलेखव- णीविचित्र॥करूनिलिहितकंजकन्या॥२७॥तेहीतेथेंराहिलीतटस्थ॥तरीआतांकेंवि करूंग्रंथ॥जरीतूंमनींधरिसीयथार्थ॥तरीकायएकनहोय॥२८॥द्वितीयेचाकिशोर- इंदु॥त्यासीजीर्णदशावाहतीदीनबंधु॥तैसेतुझेगुणकरुणासिंधु॥वर्णितसेंअल्पम ती॥२९॥सत्यवतीहृदयरत्नमराळ॥भेदीतगेलागुणनिराळ॥अंतनकळेचिसमूळ॥तो हीतटस्थराहिला॥३०॥तेथेंमीमंदमतीकिंकर॥केंविकमूंशकेंमहिमांबर॥परीआत्मसा र्थककरावयासाचार॥तवगुणार्णवींमीनजाहलों॥३१॥ऐसेशब्दएकतांसाचार॥तोष-

लादाक्षायणीवर॥ह्मणोशिवलीलामृतग्रंथपरिकर॥आरंभीरसभरीनगी॥३२॥जैसाध रूनशिशूचाहात॥अक्षरेंलिहवीपंडित॥तैसेतवमुखेंमप्रगुणसमस्त॥सुरसअत्यंतबो लवीनसी॥३३॥श्रोतींव्हावेंसावचित्त॥स्कंदपुराणींबोलिलाश्रीशकतात॥अगाधशि- वलीलामृतग्रंथ॥ब्रह्मोत्तरखंडजें॥३४॥नैमिषारण्यींशौनकादिकसुमती॥सूताप्रती प्रश्नकरिती॥तूंचिदाकाशींचारोहिणीपती॥करीतृप्तीश्रवणचकोरां॥३५॥तुवांबहुत पुराणेंसुरस॥श्रीविष्णुलीलावर्णिल्याविशेष॥अगाधमहिमाआसमास॥दशावतार वर्णिले॥३६॥भारतरामायणभागवत॥ऐकतांश्रवणझालेतृप्त॥परीशिवलीलामृत अद्भुत॥श्रवणद्वारेंप्राशनकरूं॥३७॥यावरीवेदव्यासशिष्यसूत॥ह्मणेऐकाआतांदेऊ निचित्त॥शिवचरित्रपरमाद्भुत॥श्रवणेंपातकपर्वतजळती॥३८॥आयुरारोग्यऐश्वर्य अपार॥संततिसंपत्तिज्ञानविचार॥श्रवणमात्रेंदेणार॥श्रीशंकरनिजांगें॥३९॥सक ळतीर्थव्रताचेंफळ॥महामखाचेंश्रेयकेवळ॥देणारशिवचरित्रनिर्मळ॥श्रवणेंकलि- मलनासती॥४०॥सकळयज्ञामाजीजपयज्ञथोर॥ह्मणालजपावाकोणतामंत्र॥तरी मंत्रराजशिवषडक्षर॥बीजसहितजपावा॥४१॥दुजामंत्रशिवपंचाक्षर॥दोहींचेंफ- ळएकचिसार॥तरीसंसारार्णवपार॥ब्रह्मादिसुरऋषीहाचिजपती॥४२॥दारिद्र्यदुःख

भयशोक॥ कामक्रोधद्वंद्वपातक॥ इतुक्यांसही संहारक॥ शिवतारकमंत्रजो॥ ४३॥ तुष्टिपुष्टिधृतिकारण॥ मुनिनिर्जरांसीहाचिकल्याण॥ कर्ता मंत्रराजसंपूर्ण॥ अगाधमहिमानवर्णवे॥ ४४॥ नवग्रहांतवासरमणीथोर॥ तैसामंत्रांतशिवपंचाक्षर॥ कमळोद्भवकमलावर॥ अहोरात्रहाचिजपती॥ ४५॥ शास्त्रांमाजीवेदांत॥ तीर्थांमाजीप्रयागअद्भुत॥ महाश्मशानक्षेत्रांत॥ मंत्रराजतैसाहा॥ ४६॥ शस्त्रांमाजीपाशुपत॥ देवांमाजीकैलासनाथ॥ कनकाद्रीजैसापर्वतांत॥ मंत्रपंचाक्षरीतेंविहा॥ ४७॥ केवळपरमतत्त्वचिन्मात्र॥ परब्रह्महेंचितारकमंत्र॥ तीर्थव्रतांचेसंभार॥ ओवाळूनिटाकावे॥ ४८॥ हामंत्रआत्मप्राप्तीचीरवाणी॥ कैवल्यमार्गींचाप्रकाशकतरणी॥ अविद्याकाननदाहकब्रह्माग्नी॥ सनकादिकज्ञानीहाचिजपती॥ ४९॥ स्त्रीशूद्रआदिकरूनी॥ हाचिजपमुख्यत्वेंचहूंवर्णीं॥ गृहस्थब्रह्मचारीआदिकरुनी॥ दिवसरजनीजपावा॥ ५०॥ जाग्रतींस्वप्नींयेतांजातां॥ उभेअसतांनिद्राकरितां॥ कार्यजातांबोलतांभांडतां॥ सर्वदाहीजपावा॥ ५१॥ शिवमंत्रध्वनिपंचानन॥ कर्णींआकर्णितांदोषवारण॥ उभेचिसांडितीप्राण॥ नलगतांक्षणभस्महोती॥ ५२॥ न्यासमातृकाविधीआसन॥ नलगेजपाचाप्रीतीकरून॥ शिवशिवउच्चारितांपूर्ण॥ शंकरयेऊनिपुढेंउभा॥ ५३॥ अखंडजपतीजेहामंत्र॥ त्या

सा निजांगें रक्षी त्रिनेत्र ॥ आपुल्या आंगाची साउली करी पंचवक्त्र ॥ अहोरात्र रक्षी तयां ॥ ॥५४॥ मंत्र जपकाळ गुनी ॥ शिव ह्मणे मी तुम चाक्रणी ॥ परी तो मंत्र गुरुमुखें करूनी ॥ घेइजे आर्षीं विधीनें ॥५५॥ गुरु करावा मुख्य वर्ण ॥ भक्ति वैराग्य दिव्यज्ञान ॥ सर्वज्ञ उदार दयाळू पूर्ण ॥ या चिन्हें करूनि मंडित जो ॥५६॥ मितभाषणी शांत दांत ॥ आंगी अमानित्व अदंभित्व ॥ अहिंसक अति विरक्त ॥ तोचि गुरू करावा ॥५७॥ वर्णानां ब्राह्मणो गुरुः ॥ हा वेदवचनें निर्धारू ॥ हात्यापासोनि मंत्रोच्चारु ॥ करूनि घ्यावा प्रीतीनें ॥५८॥ जरी आपणासी ठाउका मंत्र ॥ तरी गुरुमुखें घ्यावा निर्धार ॥ उगाच जपे जो अविचार ॥ तरी निर्फळ जाणिजे ॥५९॥ कामक्रोधमदयुक्त ॥ जे कां प्राणी गुरुविरहित ॥ त्यांणीं ज्ञान कथिलें बहुत ॥ परि त्यांचें मुख न पाहावें ॥६०॥ वेदशास्त्रें शोधुन ॥ जरी झालें अपरोक्षज्ञान ॥ करी संतांसी चर्चा पूर्ण ॥ तरी गुरुविण तरेना ॥६१॥ एक ह्मणती स्वप्नीं आह्मातें ॥ मंत्र सांगीतला भगवंतें ॥ आदरें सांगे लोकांतें ॥ तरी तो गुरुविण तरेना ॥६२॥ प्रत्यक्ष येऊनियां देव ॥ सांगीतला जरी गुह्यभाव ॥ परी तो न तरे स्वयमेव ॥ गुरूसी शरण न रिघतां ॥६३॥ मों जीबंधनेंवीण गायत्री मंत्र ॥ जपे तो भ्रष्ट अपवित्र ॥ वरावीण वऱ्हाडी समग्र ॥ कायव्यर्थ मिळोनी ॥६४॥ तो वाचक झाला बहुवस ॥ परी त्याचें न चुके तो गर्भवास ॥ ह्मणोन संप्रदा

यथुक्तगुरूस॥शरणजावेंनिर्धारें॥६५॥जरीगुरूकेलाभलताएक॥परीपूर्वसांप्रदाय-
नसेठाउक॥जैसेंगर्भांधासस्मयक॥वर्गव्यक्तस्वरूपनकळेची॥६६॥असोत्यामंत्रा-
चेंपुरश्चरण॥उत्तमक्षेत्रींकरावेंपूर्ण॥काशीक्षेत्रनैमिषारण्य॥गोकर्णक्षेत्रआदिकरू
नी॥६७॥शिवविष्णुक्षेत्रस्कुगम॥पवित्रस्थळींजपासप्रेम॥तरीयेचिविषयींपुरातन
उत्तम॥कथासांगेनतेंऐका॥६८॥श्रवणींपठणींनिजध्यास॥आदरेंधरावादिवसेंदिव
स॥अनुमोदनदेतांकथेस॥सर्वपापासक्षयहोय॥६९॥श्रवणमनननिजध्यास॥ध
रितांसाक्षात्कारहोयसमरस॥ब्रह्मघ्नमार्गघ्नतामस॥श्रवणेंपावनसर्वहोती॥७०॥त
रीमथुरानामनगर॥यादववंशींपरमपवित्र॥दाशार्हनामेंराजेंद्र॥अतिउदारसुलक्ष
णी॥७१॥सर्वराजेदेतीकरभार॥करजोडोनिनमितिवारंवार॥त्यांच्यामुगुटरत्नांकि-
रणींसाचार॥प्रपदेंज्याचींउजळलीं॥७२॥मुगुटघर्षणेंकरूनी॥किरणेंपडतीदिस-
तीचरणीं॥जेणेंसत्तावसनपसरुनी॥पालाणिलीकुंभिनीहे॥७३॥उभारिलायश
ध्वज॥जेंविशरत्कालींचाद्विजराज॥सकलप्रजाआणिद्विज॥चिंतितीकल्याणजया
चें॥७४॥जैसाशक्रद्वितीयेचाहिमांशु॥तेंविऐश्वर्यचढेविशेषा॥जोदुर्बुद्धीदासीस॥
स्पर्शनकरीकालत्रयीं॥७५॥सद्बुद्धीधर्मपत्नीसीरत॥स्वरूपासीतुळीजेरतिनाथ॥

॥दानशस्त्रेंसमस्त॥याचकांचेंदरिद्रनिवटिलें॥७६॥भूभुजांवरीजामदग्न्य॥समरंगणींजेंविप्रळयाग्न॥ठाणनचळेरणींहून॥कुठारघायेंभूरुहजसा॥७७॥चतुर्दशविद्याचौसष्टकळा॥आकळीजेंविकरतळींचाआंवळा॥जेणेंदानमेघेंनिवटिला॥दारिद्र्यधुरोळायाचकांचा॥७८॥बोलणेंअतिमधुर॥मेघगर्जेजेंविगंभीर॥प्रजाजनांचेंचित्तमयूर॥नृत्यकरितीस्वानंदें॥७९॥ज्याचासेनासिंधुदेखोनिअद्भुत॥जलसिंधुहोयभयाभीत॥निश्चलअंबरींचाध्रुवसत्य॥वचनतेंविनचळेची॥८०॥त्याचीकांतीरूपवतीसती॥काशीराजकुमारीनामकळावती॥तिचेंस्वरूपवर्णीसरस्वती॥विश्ववदनेंकरूनियां॥८१॥जेलावण्यसागरांतीलहरी॥खंजनाक्षीबिंबाधरी॥मृदुभाषिणीपिकस्वरी॥हंसगमनीहरिमध्या॥८२॥शशिवदनाभुजंगवेणी॥अलंकारांशोभाजिचीतनुआणी॥दशनझळकतीजेंविहिरेखाणी॥बोलतांवदनींप्रकाशपडे॥८३॥सकळकळानिपुण॥यालागींकलावतीनामपूर्ण॥जेंसौंदर्यवैरागरींचेंरत्न॥जेनिधानचातुर्यभूमीचें॥८४॥आंगींचासुवासनमायेसदनांत॥जीचेंमुखाब्जदेखतांनृपनाथ॥नेत्रमिलिंदरुंजीघालित॥धणीपाहतांनपुरेची॥८५॥नूतनआणिलीपर्णून॥मनसिजेंआकर्षिलेंरायाचेंमन॥बोलावूपाठविलेंप्रीतीकरून॥परितनयेचिप्रार्थितां॥८६॥स्वरूपश्रृंगारजाळेंपसरून,

॥आकर्षिला नृपमान समीन॥ यालागीं दाशार्हराजा उठोन॥ आपणचि गेला तिजपासीं॥ ॥८७॥ ह्मणे शृंगारवल्ली शफ्ररांगी॥ मम तनूवृक्षासी आलिंगी॥ उत्तमपुत्रफळप्रसवसी जगीं॥ अत्यानंदें सर्वदेखतां॥८८॥ तव ते शृंगारसरोवरमराळी॥ बोले सुहास्यवदनें वेल्हाळी॥ ह्मणे म्यां उपासिला शशिमौळी॥ सर्वकाळ व्रतस्थ असें॥८९॥ जे स्त्री रोगिष्ठ अत्यंत॥ गर्भिणी किंवा ऋतुस्नात॥ अभुक्त अथवा व्रतस्थ॥ वृद्ध अशक्त न भोगावी॥९०॥ स्त्रीपुरुषें हर्षयुक्त॥ असावीं तरुण रूपवंत॥ अष्टभोगें करून युक्त॥ चिंताग्रस्त न सावीं॥९१॥ पर्वकाळ व्रतदिन निरसून॥ उत्तम काळीं षड्रस अन्न भक्षून॥ मग ललना भोगावी प्रीती करून॥ राजलक्षण सत्य हें॥९२॥ राव काममदें मत्त प्रचंड॥ रतिभरें पसरोनि दोर्दंड॥ आलिंगन देतां बळें प्रचंड॥ शरीर त्याचें पोळलें॥९३॥ लोहार्गळा तप्त अत्यंत॥ तैसी कळावतीची तनू पोळत॥ नृप वेगळा होऊनि पुसत॥ कैसा वृत्तांत सांग हा॥९४॥ शृंगारसदनविलासिनी॥ मम हृदयानंदवर्धिनी॥ सकळ संशय टाकुनी॥ मुळींहुनी गोष्टी सांग॥९५॥ ह्मणे हे राजचक्रमुगुटअवतंसा॥ क्रोधें भरोनें दीमानस॥ माझा गुरु स्वामी दुर्वास॥ अनुसूयात्मज महाराज॥९६॥ त्या गुरूनें परमपवित्र॥ मज दिधला शिवपंचाक्षरमंत्र॥ तो जपतां अहोरात्र॥ परमपावन पुनीत मी॥९७॥ ममांग शीतळ अत्यंत॥ तव कलेवर पापसंयुक्त॥ अग-

म्यागमनकेलेंविचाररहित॥अभक्ष्यतितुकेंभक्षिलें॥९८॥मजश्रीगुरु दयेंकरून॥राजें-द्राआहेत्रिकालज्ञान॥तुजजपतपशिवार्चन॥घडलेंनाहींसर्वथा॥९९॥घडलेंनाहींगुरुसेवन॥पुढेंराज्यांतीनरकदारुण॥ऐकतांरावअनुतापेंकरून॥सद्गदीतजाहला॥१००॥ह्मणेकलावतीगुणगंभीरे॥तोशिवमंत्रमजदेईआदरें॥ज्याचेनिजपेंसवत्रें॥महत्पापेंभस्महोतीं॥१॥तीह्मणेहेभूभुजेंद्र॥मजसांगावयानाहींअधिकार॥मीवल्लभतूंप्राणेश्वर॥गुरु-निर्धारितूंमाझा॥२॥तरीयादवकुळींगुरुवसिष्ठ॥गर्गमुनीमहाराजश्रेष्ठ॥जोज्ञानियांमा-जींदिव्यमुगुट॥विद्यावरिष्ठतयाची॥३॥जैसेवसिष्ठवामदेवज्ञानी॥तैसामहाराजगर्गमुनी॥त्यासीनृपश्रेष्ठाशरणजाउनी॥शिवदीक्षाघेइजे॥४॥मगकलावतीसहि-तभूपाळ॥गर्गाश्रमींपातलातत्काळ॥साष्टांगनमूनिकरकमळ॥जोडूनउभाठाकला॥५॥अष्टभावेंदाटूनहृदयीं॥ह्मणेशिवदीक्षामजदेईं॥ह्मणोनिपुढतीलागेपाईं॥मितीनाहींभावार्था॥६॥यावरीतोगर्गमुनी॥कृतांतभगिनीतीरायेउनी॥पुण्यवृक्षातळींबैसोनी॥स्नानकरीयमुनेचें॥७॥उभयतांनींकरूनिस्नान॥यथासांगकेलेंशिवपूजन॥यावरीदिव्यरत्नेंआणून॥अभिषेककेलागुरूसी॥८॥दिव्याभरणेंदिव्यवस्त्रें॥गुरुपूजिलानृपेंआदरें॥गुरुदक्षिणेसीभांडारें॥दाशार्हरायेंसमर्पिलीं॥९॥तनुमनधनेंसींउ

दार॥गर्गचरणीं लागे नृपवर॥ असोनि गुरूसीं जे वंचिती पामर॥ ते दारुण निरय भोगि
ती॥११०॥ श्रीगुरूचे घरीं आपदा॥ आपण भोगी सर्व संपदा॥ कैंचें ज्ञान त्या मतिमंदा॥ गु
रूब्रह्मानंदा न भजे जो॥११॥ एक ह्मणती तन मन धन॥ नाशवंत गुरूसी काय अर्पून॥ पर
म चांडाळ त्याचें शठज्ञान॥ कदा वदन न पाहावें॥१२॥ धिक् विद्या धिक् ज्ञान॥ धिक् वैराग्य
धिक् साधन॥ चतुर्वेद शास्त्रें आला पढून॥ धिक् पठण तयाचें॥१३॥ जैसा खर पृष्ठाव-
री चंदन॥ षड्रसीं दर्वी व्यर्थ फिरोन॥ जैं विमा पेतंडुल मोजून॥ इकडून तिकडे टाकिती॥
॥१४॥ घ्राणा इक्षुरस गाळी॥ इतर सेविती रसनवाळी॥ कीं पात्रांत शर्करा सांठविली॥
परी गोडी न कळे तया॥१५॥ असो ते अभाविक खळ॥ तैसा न व्हे तो दाशार्ह नृपाळ॥ षो
डशोपचारें निर्मळ॥ पूजन केलें गुरूचें॥१६॥ उभा ठाकला कर जोडुन॥ मग तो गर्ग हृद
यीं धरून॥ मस्तकीं हस्त ठेवून॥ शिवषडक्षर मंत्र सांगे॥१७॥ हृदयआकाशभुवनीं॥
उगवला निजबोध तरणी॥ अज्ञान तम तेचि क्षणीं॥ निरसून नवल जाहलें॥१८॥ अद्भुत
मंत्राचें महिमान॥ रायाचिया शरीरामधून॥ कोट्यावधी काग निघून॥ पळते झाले ते ध
वां॥१९॥ किती एकांचे पक्ष जळाले॥ चरफडत चि बाहेर आले॥ अवघेचि भस्म होऊनि गे
ले॥ संख्या नाहीं तयांतें॥२०॥ जैसा किंचित पडतां कृशान॥ दग्ध होय कंटकवन॥ तैसे-

कागगेलेजळोन॥ देखोनिरावनवलकरी ॥२१॥ गुरूसीनमूनिधुसेनृप॥ कागकेंन्वेनिघा लेअसुप॥ माझेंझालेंदिव्यरूप॥ निर्जरांहूनिआगळें॥२२॥ गुरूह्मणेएकसासेपें॥ अ नंतजन्मींचींमहापापें॥ बाहेरनिघालींकागरूपें॥ शिवमंत्रप्रभावेंभस्मझालीं॥२३॥ निष्पापझालानृपवर॥ गुरुस्तवनकरीवारंवार॥ धन्यपंचाक्षरमंत्र॥ तूंधन्यगुरुपंचा क्षरी॥२४॥ पंचभूतांचीझाडणीकरून॥ सावधकेलेंमजलागुन॥ चारीदेहनिरसुन॥ केलेंपावनगुरुराया॥२५॥ पंचवीसतत्वांचामेळ॥ त्यांतसांपडलोंबहुतकाळ॥ क्रोध- महिषासुरसबळ॥ कामवेताळधुसधुसी॥२६॥ आशामनीषातृष्णाकल्पना॥ भ्रांती भुलीइच्छावासना॥ याजखिणीयक्षिणीनाना॥ विटंबितमजहोत्या॥२७॥ ऐसाअव घामायामेळ॥ तुवांनिरसिलातात्काळ॥ धन्यपंचाक्षरीमंत्रनिर्मळ॥ गुरुदयाळधन्यतूं ॥२८॥ सहस्त्रजन्मपर्यंत॥ मजज्ञानझालेंसमस्त॥ पापेंजळालींअसंख्यात॥ कागरू पेंदेखिलींम्या॥२९॥ स्वर्णस्तेयअभक्षभक्षक॥ सुरापानगुरुतल्पक॥ परदारागमन गुरुनिंदक॥ ऐसींनानामहत्पापें॥३०॥ गोहत्याब्रह्महत्याधर्मलोपक॥ स्त्रीहत्यागुरुह त्याब्रह्मछळक॥ परनिंदापरहिंसक॥ वृत्तिहारकअगम्यस्त्रीगमन॥३१॥ मित्रद्रोही- गुरुद्रोही॥ विश्वद्रोहीवेदद्रोही॥ प्रासादभेदलिंगभेदपाहीं॥ पंक्तिभेदहारिहरभेद॥३२

ज्ञानचोरपुस्तकचोर पक्षिघातक ॥ पाखंडमती मिथ्यावादक ॥ भेदबुद्धी भ्रष्टमार्ग-
स्थापक ॥ स्त्रीलंपट दुराचारी ॥ ३३ ॥ कृतघ्न परद्रव्यापहारक ॥ कर्मभ्रष्ट तीर्थमहिमा
उच्छेदक ॥ बकध्यानी गुरुछलक ॥ मातृहतक पितृहत्या ॥ ३४ ॥ दुर्बलघातक कर्ममार्ग
घ्न ॥ दीनहत्यारी पाहतपैशून्य ॥ तृणदाहक पीडित्ती सज्जन ॥ गोत्रवध भगिनीवध ॥
॥ ३५ ॥ कन्याविक्रय गोविक्रय ॥ हयविक्रय रसविक्रय ॥ ग्रामदाहक आत्महत्या अपाय
॥ भ्रूणहत्या महापापें ॥ ३६ ॥ हीं महापापें सांगीतलीं ॥ क्षुद्रपापें नाहीं गणिलीं ॥ इतुकीं
कागरूपें निघालीं ॥ भस्म झालीं प्रत्यक्ष ॥ ३७ ॥ कांहीं गांठीं पुण्य होतें परम ॥ म्हणोनि नि
रदेह पावलों उत्तम ॥ गुरुप्रतापें तरलों निःसीम ॥ काय महिमा बोलों आतां ॥ ३८ ॥ गुरु
स्तवन करून अपार ॥ ग्रामास आला दाशार्ह नृपवर ॥ सवें कलावती परम चतुर ॥ केला
उद्धार रायाचा ॥ ३९ ॥ जपतां शिवमंत्र निर्मळ ॥ राज्य वर्द्धमान झालें सकळ ॥ अवर्षण
दोष दुष्काळ ॥ देशांतून पळाले ॥ ४० ॥ वैधव्य आणि रोग मृत्य ॥ नाहींच कोठें देशांत ॥
आलिंगितां कलावतीसी नृपनाथ ॥ शशी ऐसी शीतळ वाटे ॥ ४१ ॥ शिवभजनीं लाविले
सकलजन ॥ घरोघरीं होत शिवकीर्तन ॥ रुद्राभिषेक शिवपूजन ॥ ब्राह्मणभोजन यथा
विधी ॥ ४२ ॥ दाशार्हरायाचें आख्यान ॥ जे लिहिती ऐकती करिती पठण ॥ प्रीती करून निग्रं-

थरक्षण॥ अनुमोदन देती जे॥ ४३॥ सफल त्यांचा संसार॥ त्यासी निजांगें रक्षी श्रीशंकर ॥ धन्य धन्य ते चि नर॥ शिवमहिमा वर्णिती जे॥ ४४॥ पुढें कथा सुरस फार॥ अमृताहूनि रसिक सार॥ ऐकोत पंडित चतुर॥ गुरुभक्त प्रेमळ ज्ञानी जे॥ ४५॥ पूर्णब्रह्मानंद शूलपाणी ॥ श्रीधरसुखनिमित्त करूनी॥ तो च बोलवीत विचारोनी॥ पाहावें मनीं निर्धारें॥ ४६॥ श्रीधरवरद पांडुरंग॥ तेणें शिरीं धरिलें शिवलिंग॥ पूर्णब्रह्मानंद अभंग॥ नव्हे विरंग कालत्रयीं ॥ ४७॥ शिवलीलामृत ग्रंथ प्रचंड॥ स्कंदपुराण ब्रह्मोत्तरखंड॥ परिसोत सज्जन अखंड॥ प्रथमोऽध्याय गोड हा॥ १४८॥ ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु॥ ॥ श्रीरस्तु॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥जेथेंसर्वदाशिवस्मरण॥तेथेंभुक्तिमुक्तिसर्वकल्याण॥नानासं कटेंविघ्नेंदारुण॥नबाधतीकालत्रयीं॥१॥संकेतेंअथवाहास्यकरून॥ मलत्यामिषेंघ डोशिवस्मरण॥नकळतांपरिसासीलोहजाण॥संघटतांस्कवर्णकरीकीं॥२॥नक ळतांप्राशिलेंअमृत॥परीअमरकरीयथार्थ॥औषधीनेणतांभक्षित॥परीरोगसर्वथा हरीकीं॥३॥शुष्कतृणपर्वतअद्भुत॥नेणतांबाळकअकस्मात॥अग्निस्फुलिंगटाकित॥ परीभस्मयथार्थकरीकीं॥४॥तैसेंनकळतांघडेशिवस्मरण॥परीसकळदोषांहोयदहन ॥अथवाविनोदेंकरून॥शिवस्मरणघडोकां॥५॥हेंकांव्यर्थहांकाफोडिती॥शिवशिव नामेंओरडती॥अरेकांहेउगेनराहती॥हरहरगर्जतीवेळोवेळां॥६॥शिवनामाचाकरिती कोल्हाळ॥माझेंउठविलेंकपाळ॥शिवशिवह्मणतीवेळोवेळ॥काययेतेंयांच्याहाता॥७ ऐसीहेळणाकरीक्षणोक्षणीं॥परीउमावल्लभनामयेवदनीं॥पुत्रकन्यानामेंकरूनी॥शिव स्मरणघडोकां॥८॥महाप्रीतीनेंकरितांशिवस्मरण॥आदरेंकरितांशिवध्यान॥शिव स्वरूपमानूनिब्राह्मण॥संतर्पणकरींसदा॥९॥ऐसीशिवींआवडीधरी॥त्याहीमाजीं आ लीशिवरात्री॥उपवासजागरणकरी॥होयबाहेरीमहत्पापा॥१०॥त्यादिवसींबिल्वदळें घेउन॥यथासांगघडलेंशिवार्चन॥तरीसहस्रजन्मींचेंपापसंपूर्ण॥भस्महोऊनजाईल॥

॥११॥ नित्य बिल्वदळें शिवासी वाहत ॥ त्याएवढा नाहीं पुण्यवंत ॥ तो तरेल हें नवल नव्हे सत्य ॥ त्याच्या दर्शनें बहुत तरती ॥ १२ ॥ प्रातःकाळीं घेतां शिवदर्शन ॥ यामिनीचें पाप-जाय जळोन ॥ पूर्वजन्मींचे दोष गहन ॥ मध्यान्हीं दर्शन घेतां नुरती ॥ १३ ॥ सायंकाळीं शिव पाहतां सप्रेम ॥ सप्तजन्मींचें पाप होय भस्म ॥ शिवरात्रीचा महिमा परम ॥ शेषही वर्णूं शकेना ॥ १४ कपिलाषष्ठी अर्धोदय संक्रमण ॥ महोदय गजच्छाया ग्रहण ॥ इतकेही पर्वकाळ ओंवाळून ॥ शिवरात्री वरून टाकावे ॥ १५ ॥ शिवरात्री आधींच पुण्यदिवस ॥ त्याही वरी पूजन जागरण विशेष ॥ त्रिकाळ पूजा आणि रुद्र घोष ॥ त्याच्या पुण्यासी पार नाहीं ॥ १६ ॥ वशिष्ठ विश्वामित्रादि मुनीश्वर ॥ सुरगण गंधर्व किन्नर ॥ सिद्धचारण विद्याधर ॥ शिवरात्रीव्रत करिताती ॥ १७ ॥ यदर्थीं सुरस कथा बहुत ॥ शौनकादिकां सांगे सूत ॥ ती श्रोतीं ऐकावी सावधान चित्त ॥ अत्यादरें करूनियां ॥ १८ ॥ तरी मासांमाजी माघमास ॥ ज्याचा व्यास महिमा वर्णी विशेष ॥ त्याही माजी कृष्णचतुर्दशीस ॥ मुख्य शिवरात्र जाणिजे ॥ १९ ॥ विंध्याद्रिवासी एक व्याध ॥ मृगपक्षिघातक परम निषिद्ध ॥ महा निर्दय हिंसक निषाद ॥ केले अपराध बहुत तेणें ॥ २० ॥ धनुष्यबाण घेऊन करीं ॥ पारधीस चालिला दुराचारी ॥ पाशवागुरा कक्षेसी धरी ॥ कवचले तहरितवर्ण ॥ २१ ॥ करीं गोधांगुलित्राण ॥ आणीक हातीं शस्त्र

सामग्रीघेउन ॥ काननींजातांशिवस्थान ॥ शोभायमानदेखिलें ॥ २२ ॥ तंवतोशिवरात्रीचा दिन ॥ यात्राआलीचहूंकडोन ॥ शिवमंदिरश्रृंगारुन ॥ शोभाआणिलीकैलासींची ॥ २३ ॥ शुद्धरजततगटवर्ण ॥ देवालयझळकेंशोभायमान ॥ गगनचुंबितध्वजपूर्ण ॥ रत्नजडितकळसतळपती ॥ २४ ॥ मध्येंमणिमयशिवलिंग ॥ भक्तपूजाकरितीसांग ॥ अभिषेकधाराअभंग ॥ विप्रधरितीरुद्रघोषें ॥ २५ ॥ एकटाळमृदंगघेउन ॥ सप्रेमेंकरितीशिवपूजन ॥ श्रोतेकरटाळीवाजवून ॥ हरहरशब्देंघोषकरिती ॥ २६ ॥ नानापरिमळद्रव्यसुवास ॥ तेणेंदशदिशादुमदुमिल्याविशेष ॥ लक्षदीपांचेप्रकाश ॥ जलजघोषघंटारव ॥ २७ ॥ शशिमुखवागर्जतीभेरी ॥ त्यांचानादनमायेअंबरीं ॥ एवंचतुर्विधवाद्येंनानापरी ॥ भक्तवाजवितीआनंदें २८ तोतेथेंव्याधपातला ॥ समोरविलोकीसर्वसोहळा ॥ एकमुहूर्तउभाठाकला ॥ हांसतबोलिलाविनोदें ॥ २९ ॥ हेमूर्खअवघेजन ॥ येथेंद्रव्यकायनासोन ॥ आंतदगडबाहेरपाषाण ॥ देवपणयेथेंकेंचें ॥ ३० ॥ उत्तमअन्नसांडून ॥ व्यर्थकांकरितीउपोषण ॥ ऐसियाचेष्टाकरीततेथुन ॥ काननाप्रतीजातसे ॥ ३१ ॥ लोकनामेंगर्जतीवारंवार ॥ आपणहीविनोदेंह्मणेंशिवहरहर ॥ सहजसव्यघालूनिशिवमंदिर ॥ घोरकांतारप्रवेशला ॥ ३२ ॥ वाचेसीलागलातोचिवेध ॥ विनोदेंबोलेशिवशिवशब्द ॥ नामप्रतापेंदोषअगाध ॥ झडतसर्वचालिले ॥

॥ ३३ ॥ घोरांदरसेवितांवन ॥ नाढळतीचजीवलघुदारुण ॥ तोंवरुणदिग्वधूचेंसदन ॥ वासरमणीप्रवेशला ॥ ३४ ॥ निशाप्रवर्तलीसबळ ॥ कींब्रह्मांडकरंडाभरलेंकाजळ ॥ कींविशाळकृष्णकंबळ ॥ मंडपकायउभारिला ॥ ३५ ॥ विगतधवाजेवींकामिनी ॥ तेवींनशोभेकदायामिनी ॥ जरीमंडितदिसेउडुगणीं ॥ परीपतिहीनरजनीते ॥ ३६ ॥ जैसापंडितगेलियासभेतुन ॥ मूर्खजल्पतीपाखंडज्ञान ॥ तेवींअस्ताजातांसहस्रकिरण ॥ उडुगणमागेंझळकती ॥ ३७ ॥ असोऐशीनिशादाटलीसुबुद्ध ॥ अवघावेळउपवासीनिषाद ॥ तोंएकसरोवरअगाध ॥ दृष्टीदेखिलेंशोधितां ॥ ३८ ॥ अनेकसंपत्तीसभाग्यसदनीं ॥ तेवींसरोवरीशोभतीकुमुदिनी ॥ तटींबिल्ववृक्षगगनीं ॥ शोभायमानपसरला ॥ ३९ ॥ योगभ्रष्टकर्मभूमीसपावतीजनन ॥ तेवींबिल्वडाहाळियागगनींहून ॥ भूमीसलागल्यायेउन ॥ माजीरविशशिकिरणनदिसे ॥ ४० ॥ त्यांततमदाटलेंदारुण ॥ माजीबैसलाव्याधयेउन ॥ शरासनींशरलावुन ॥ कानाडीओढूनसावजलक्षी ॥ ४१ ॥ दृष्टीबिल्वदळेंदाटलीबहुत ॥ तींदक्षिणहस्तेंखुटोनिटाकित ॥ तोंतेथेंपद्मजहस्तेंस्थापित ॥ शिवलिंगदिव्यहोतें ॥ ४२ ॥ त्यावरीबिल्वदळेंपडत ॥ तेणेंसंतोषलाअपर्णानाथ ॥ व्याधासउपवासजागरणघडत ॥ सायासनकरितांअनायासें ॥ ४३ ॥ वाचेसिशिवनामाचाचाळा ॥ हरहरह्मणेंवेळोवेळां ॥ पापक्षयहोतचालिला ॥ पूजनस्मरणसर्वघडलें ४४

एकयामझालीरजनी॥तोंजलपानालागींएकहरणी॥आलीतेथेंतीगर्भिणी॥परमसकुमा
रतेजस्विनी॥४५॥व्याधतिणेंलक्षिलादुरून॥कृतांतवत्परमदारुण॥आकर्णओढिलाबाण
॥देखोनिहरिणीबोलतसे॥४६॥ह्मणेमहापुरुषाअन्यायाविण॥कांमजवरीलाविलाबाण
॥मीतवआहेंगर्भिण॥वधतुवांनकरावा॥४७॥उदरांतगर्भसूक्ष्मअज्ञान॥वधितांतुजदोष
दारुण॥एकरथभरीजीववधितांसान॥तरीएकवत्सवधियेला॥४८॥शतवत्सवधितांएक
॥वृषभहत्येचेंपातक॥शतवृषभतैंगोहत्यादेख॥घडलीशास्त्रवदतसे॥४९॥शतगोह
त्येचेंपातकपूर्ण॥एकवधितांहोयब्राह्मण॥शतब्रह्महत्येचेंपातकजाण॥एकस्त्रीवधिलि
या॥५०॥शतस्त्रियांहूनिअधिक॥एकागुरुहत्येचेंपातक॥त्याहूनिशतगुणितदेख॥एक
गर्भिणीवधिलिया॥५१॥तरीअन्यायनसतांयेअवसरीं॥मजमारिसीकांवनांतरीं॥व्याध
ह्मणेकुटुंबघरीं॥उपवासीवाटपाहतसे॥५२॥मीहीआजिनिराहार॥अन्ननाहींचअणुमात्र
॥परीमृगीहोऊनिसुंदर॥गोष्टीवदसीशास्त्रींच्या॥५३॥मजआश्चर्यवाटतेंपोटीं॥नराऐशा
सांगसीगोष्टी॥तुजदेखोनियांहष्टी॥दयाहृदयींउपजतसे॥५४॥पूर्वीतूंहोतीसकोण॥तुज
एवढेंज्ञानकोठून॥तूंविशालनेत्रीरूपलावण्य॥सर्ववर्तमानमजसांगें॥५५॥मृगीह्मणेते-
अवसरीं॥पूर्वीमंथनकरितांक्षीरसागरीं॥चतुर्दशरत्नेंकाढिलींसुरासुरीं॥महाप्रयत्नेंकरू

नियां॥५६॥त्यामाजीमीरंभाचतुर॥मजदेखोनिभुलतीसुरवर॥नानातपेंआचरोनिअ
पार॥तपस्वीपावतीआह्मातें॥५७॥म्यानयनकटाक्षजालपसरुन॥बांधिलेनिर्जरांचेंम
नमीन॥माझियाअंगसुवासेंवेधुन॥मुनिभ्रमरधांवती॥५८॥माझेंगायनऐकावयासु
रंग॥सुधापानीधांवतीकुरंग॥मीभोगीस्वर्गीचेदिव्यभोग॥स्वरूपेंनमानीकोणासी ५९
मदअंगींचढलाबहुत॥शिवभजनटांकिलेंसमस्त॥शिवरात्रीसोमवारप्रदोषव्रत॥
शिवार्चनसांडिलेंम्यां॥६०॥सोडूनियांसुधापान॥करूंलागल्येंमद्यप्राशन॥हिरण्य
नामादैत्यदारुण॥सुरसोडुनिरतलेंत्यासीं॥६१॥ऐसालोटलाकाळअपार॥मृगयेसंगे
लातोअसुर॥त्यादुष्टासंगेंअपर्णावर॥भजनपूजनविसरल्यें॥६२॥मनासऐसेंवाटलें
पूर्ण॥असुरगेलामृगयेलागुन॥इतुक्यांतघ्यावेंशिवदर्शन॥ह्मणोनिगेल्येंकैलासा॥६३
मजदेखतांहिमनगजामात॥परमक्षोभोनिशापदेत॥तूंपरमपापिणीयथार्थ॥मृगीहोईंमृ
त्युलोकीं॥६४॥तुझ्यासख्यादोघीजणी॥त्याहोतीलतुजसवेंहरिणी॥हिरण्यअसुरमाझिये
भजनीं॥असावधसर्वदा॥६५॥तोहीमृगहोऊनिसत्य॥तुह्मांसीचहोईलरत॥ऐकव्याधासाव
चित्त॥मगम्याशिवप्रार्थिला॥६६॥हेपंचवदनाविरूपाक्षा॥सच्चिदानंदाकर्माध्यक्षा॥दक्षम
खदळणासर्वसाक्षा॥उश्शापदेईआह्मातें॥६७॥भोळाचक्रवर्तीदयाळ॥उश्शापवदलापयःफे

नधवल ॥ द्वादशवर्षें भरतांतात्काळ ॥ पावालमाझियापदातें ॥ ६८ ॥ मगआह्मींमृगयोनी ॥ जन्म
लोंयेकर्मअवनी ॥ तरीमीगर्भिणीआहेंहरिणी ॥ प्रसूतिकाळसमीपआला ॥ ६९ ॥ तरीमीआपुल्या
स्वस्थळाजाऊन ॥ सत्वरयेत्येंगर्भठेवुन ॥ मगतूंसुखेंघेईंप्राण ॥ सत्यवचनहेंमाझें ॥ ७० ॥ ऐसीबोल
लीसावचित्त ॥ यावरीतोव्याधकायबोलत ॥ तूंगोडबोलसीयथार्थ ॥ परीविश्वासमजनवाटे ७१
नानापरीअसत्यबोलोन ॥ करावेंशरीराचेंसंरक्षण ॥ हेंप्राणिमात्रासआहेज्ञान ॥ तरीतूंशपथ-
वदेआतां ॥ ७२ ॥ महत्पापेंउच्चारुन ॥ शपथदेयथार्थपूर्ण ॥ यावरीतीहरिणीदीनवदन ॥ वाहत
आणऐकातें ॥ ७३ ॥ ब्राह्मणकुळींउपजोन ॥ जोनकरीवेदशास्त्राध्ययन ॥ सत्यशौचव
र्जितसंध्याहीन ॥ माझेशिरींपातकतें ॥ ७४ ॥ एकवेदविक्रयकरितीपूर्ण ॥ कृतघ्नपरपीडक
नावडेभजन ॥ एकदानासीकरितीविघ्न ॥ गुरुनिंदाश्रवणएककरिती ॥ ७५ ॥ रमावरउमावरांची
निंदा ॥ त्यापापाचीमजहोयआपदा ॥ दानदीधलेंजेंब्रह्मवृंदा ॥ हिरोनियेतीमाघारें ॥ ७६ ॥ एक
यतिनिंदाकरिती ॥ एकशास्त्रेंपाहतीद्वैतनिर्मिती ॥ नानाभ्रष्टआचरती ॥ स्वधर्मआपुलासां
डुनियां ॥ ७७ ॥ देवालयामाजींजाउनी ॥ हरिकथापुराणश्रवणीं ॥ जेबैसतीविडाखाउनी ॥ तेको
डीहोतीपापिये ॥ ७८ ॥ जेदेवळांतकरितीस्त्रीसंभोग ॥ कींस्त्रीभ्रतारांसीकरितीवियोग ॥ तेनं
पुंसकहोऊनिअभाग्य ॥ उपजतीयाजन्मीं ॥ ७९ ॥ धर्मकर्मनिंदाकरित ॥ तेगजपुरीषभक्षककाक

होत ॥ शिष्यासी विद्या असोनन सांगत ॥ तो पिंगळा होत निर्धारें ॥ ८० ॥ अनुचित प्रतिग्रह ब्राह्मण घेती ॥ त्यानिमित्तें गंडमाळा होती ॥ परदेशीं च्या गाई वळूनि आणिती ॥ ते अल्पायुषी होतीया जन्मीं ॥ ८१ ॥ जो राजा करी प्रजापीडण ॥ तो या जन्मीं व्याघ्र कां सर्प दारुण ॥ वृथा करी साधु छळण ॥ निर्वंश होय पूर्ण त्याचा ॥ ८२ ॥ स्त्रिया व्रत नेम करित ॥ भ्रतारासी अव्हेरित ॥ धनधान्य असोनि वंचित ॥ त्या वागुळा होती या जन्मीं ॥ ८३ ॥ पुरुष कुरूप म्हणोनि त्यागिती ॥ त्या या जन्मीं बाळविधवा होती ॥ तेथेंही जारकर्में करिती ॥ मग त्या होती वारांगना ॥ ८४ ॥ ज्या भ्रतारासी निर्भर्त्सिती ॥ त्या दासी किंवा कुलटा होती ॥ सेवक स्वामीचा द्रोह करिती ॥ ते जन्मा येती श्वानाच्या ॥ ८५ ॥ सेवका पासून सेवा घेउन ॥ त्याचें न दे जो वेतन ॥ तो अत्यंत भिकारी होउन ॥ दारोदारीं हिंडतसे ॥ ८६ ॥ स्त्री पुरुष गुज बोलतां ॥ जो जाऊनि ऐके तत्वतां ॥ त्याची स्त्री दुरावे हिंडतां ॥ अन्न न मिळे तयातें ॥ ८७ ॥ जे जारण मारण करिती ॥ ते भूत प्रेत पिशाच होती ॥ यती उपवासें पीडिती ॥ त्यातें दुष्काळ जन्मवरी ॥ ८८ ॥ स्त्री रजस्वला होउनी ॥ गृहीं वावरे जे पापिणी ॥ पूर्वज रुधिरीं पडती पतनी ॥ ते घरीं पितृगण न येती ॥ ८९ ॥ देवाच्या दीपाचें जें तेल नेती ॥ ते या जन्मीं निपुत्रिक होती ॥ ज्या रांधितां अन्न चोरूनि भक्षिती ॥ त्या मार्जारी होती या जन्मीं ॥ ९० ॥ ब्राह्मणांस कदान्न घालून ॥ आपण भक्षिती षड्रस पक्वान्न ॥ त्यांचे गर्भ पडती ग-

ळोन॥ आपुलियाकर्मवशें॥९१॥ जोमातापित्यासीशिणवित॥ तोयेजन्मींमर्कटहोत॥ सासुस्वशुरांस्नुषागांजित॥ तरीबाळकनवांचेतियेचें॥९२॥ मृगीह्मणेव्याधालागुन॥ जरीमीनयेपरतोन॥ तरीहींमहत्पापेंसंपूर्ण॥ माझेमाथांबैसोत॥९३॥ हेमिथ्यागोष्टहोयसाचार॥ तरीघडोशिवपूजेचाअपहार॥ ऐसीशपथऐकतांनिर्धार॥ व्याधशंकलामानसीं॥९४॥ ह्मणेंपतिव्रतेजाईआतां॥ सत्वरयेईंनिशासरतां॥ हरिणीह्मणेशिवपदासीतत्वतां॥ पुण्यवंताजाशील॥९५॥ उदकपानकरूनिवेगीं॥ निजाश्रमींगेलीतेकुरंगी॥ इकडेव्याधदक्षिणभागीं॥ टाकीबिल्वदळेंखुडूनियां॥९६॥ दोनप्रहरझालीयामिनी॥ द्वितीयपूजाशिवेंमानुनी॥ अर्धपापजळालेंमुळींहूनी॥ सप्तजन्मीचेंतेधवां॥९७॥ नामींआवडजडलीपूर्ण॥ व्याधकरीशिवस्मरण॥ मृगीमुखेंऐकिलेंनिरूपण॥ सहजजागरणघडलेंतया॥९८॥ तोंदुसरीहरिणीअकस्मात॥ पातलीचतेथेंतृषाक्रांत॥ व्याधेंबाणओढितांत्वरित॥ करुणाभाकीहरिणीते॥९९॥ ह्मणेव्याधाऐकयेसमयीं॥ मजकामानळेंपीडिलेंपाहीं॥ पतीसभोगदेवुनिलवलाहीं॥ परतोनियेत्येंसत्वर॥१००॥ व्याधआश्चर्यकरीमनांत॥ ह्मणेशपथबोलोनिजाईत्वरित॥ धन्यतुमचेंजीवित॥ सर्वशास्त्रार्थठाउका॥१॥ वापीतडागसरोवर॥ जोपतितमोडीदेवागार॥ गुरुनिंदकमद्यपीदुराचार॥ तेंपापेंसमग्रमस्तकींमाझ्या॥२॥ महाक्ष

त्रियआपणह्मणवित ॥ समरांगणींमागेंपळत ॥ वृत्तिहारीसीमालोटित ॥ ग्रंथनिंदितमहापुरुषांचे ॥ ३ ॥ वेदशास्त्राचीनिंदाकरी ॥ संतभक्तांसीद्वेषकरी ॥ हरिहरचरित्रेंअव्हेरी ॥ माझेशिरींतींपापें ॥ ४ ॥ धनधान्यअसोनिपाहीं ॥ पतीलागींशिणवीह्मणेनाहीं ॥ पतीसांडीनिजेपरगृहीं ॥ तींपापेंमाझियामाथां ॥ ५ ॥ पुत्रस्नुषासन्मार्गेवर्ततां ॥ त्यांसीव्यर्थीचिगांजितीजेनपाहतां ॥ तेकुरूपहोतीतत्वतां ॥ हिंडतांभिक्षानमिळेचि ॥ ६ ॥ बंधुबंधुजेवैरकरिती ॥ तेयेजन्मींमत्स्यहोती ॥ गुरूचेंउणेंजेपाहती ॥ त्यांचीसंपत्तिदग्धहोय ॥ ७ ॥ जेमार्गस्थांचींवस्त्रेंहरिती ॥ तेअतिशूद्रप्रेतवस्त्रेंपांघुरती ॥ आह्मीतपस्वीह्मणोनअनाचारकरिती ॥ तेघुलेहोतीमोकाट ॥ ८ ॥ दासीस्वामीचीसेवानकरी ॥ तीयेजन्मींहोयमगरी ॥ जोकन्याविक्रयकरी ॥ हिंसकयोनीनिपजेतो ॥ ९ ॥ स्त्रीभ्रतारांचीसेवाकरित ॥ तीसजोव्यर्थचिगांजित ॥ त्याचागृहभंगहोत ॥ जन्मजन्मांतरींनसुटे ॥ १० ॥ ब्राह्मणकरीरसविक्रय ॥ घेतांदेतांमद्यपीहोय ॥ जोब्रह्मवृंदाअपमानिताहोय ॥ तोजाणाब्रह्मराक्षस ॥ ११ ॥ एकेंउपकारकेला ॥ जोनष्टनाठवीत्याला ॥ तोकृतघ्नजंतझाला ॥ पूर्वकर्मीजाणिजे ॥ १२ ॥ विप्रश्राद्धींजेऊनी ॥ स्त्रीभोगकरितीतेदिनीं ॥ तोश्वानसूकरयोनी ॥ उपजेलनिःसंशये ॥ १३ ॥ व्यवहारीदाहांतबैसोन ॥ खोटीसाक्षदेईगर्जोन ॥ पूर्वजनरकींपावतीपतन ॥ असत्यसाक्षदेतांची ॥ १४ ॥ दोघीस्त्रियाकरून ॥

एकीचेंचजोराखीमन ॥ तोगोंचीडहोयजाण ॥ सारमेयशरीरीं ॥ १५ ॥ पूर्वजन्मींकोंडींउद-
क ॥ त्याचामळमूत्रनिरोधदेख ॥ करितांसाधुनिंदाआवश्यक ॥ सत्वरदंतभग्नहोती ॥ १६ ॥
देवालयींकरीभोजन ॥ तरीयेजन्मींहोयक्षीण ॥ पृथ्वीपतीचीनिंदाकरितांजाण ॥ उदरींमं
दाग्नीहोयपैं ॥ १७ ॥ ग्रहणसमयींकरीभोजन ॥ त्यासीपित्तरोगहोयदारुण ॥ परबाळेंवि-
कीपरदेशींनेउन ॥ तरीसर्वांगींकुष्ठभरे ॥ १८ ॥ जीस्त्रीकरीगर्भपतन ॥ तीउपजेवंध्याहोउ
न ॥ देवालयदारकीपाडोन ॥ तरीअंगभंगहोयत्याचा ॥ १९ ॥ अपराधावीणस्त्रीसीगांजिताहे
॥ त्यांचेंयाजन्मींएकअंगजाय ॥ ब्राह्मणाचेंअन्नहरितीपापिये ॥ त्यांचावंशनवाढेकधीं २०
गुरुसंतमातापिता ॥ त्यांसीजोहोयनिर्भर्त्सिता ॥ तरीवाचाजायतत्वतां ॥ अडखळे-
बोलतांक्षणक्षणा ॥ २१ ॥ जोब्राह्मणासीदंडमारी ॥ त्यासीव्याधीतिडकालागतीशरीरीं
॥ जोसंतांसीवादविवादकरी ॥ दीर्घदंतहोतीत्याचे ॥ २२ ॥ देवद्वारींचेतरुवर ॥ अश्वत्थादिवृक्ष
साचार ॥ तोडितांपांगळाहोयनिर्धार ॥ भिक्षानमिळेहिंडतां ॥ २३ ॥ जोसूतकअन्नभक्षित ॥
त्याचेउदरींनानारोगहोत ॥ आपणचिपरिमळद्रव्यभोगीसमस्त ॥ तरीदुर्गंधीसत्यसर्वां-
गीं ॥ २४ ॥ ब्राह्मणाचेंऋणनदेतां ॥ तरीबाळपणींमृत्युपावेपिता ॥ जलवृक्षछायामोडितां ॥
तरीएकहीस्थळनमिळेंत्यातें ॥ २५ ॥ ब्राह्मणासीआशालावुन ॥ चालवीनेदीकदादान ॥ तोये

जन्मीं अन्न अन्न ॥ करीत हिंडे घरोघरीं ॥ २६ ॥ जो पुत्र द्वेष करित ॥ आणि दरिद्रीयाचें लग्न मो
डित ॥ तरी स्त्री ससल राहे पोटांत ॥ वंध्या निश्चित संसारीं ॥ २७ ॥ जेणें ब्राह्मण बांधिले निग्र
हून ॥ त्यासी सांडसें तोडी सूर्यनंदन ॥ जो नायके कथा ग्रंथ पावन ॥ बधिर होय जन्मोजन्मीं
॥ २८ ॥ जो पीडी मातापितयांस ॥ त्याचा सर्वदा होईल कार्यनाश ॥ एकास भजे निंदी सर्वदे
वांस ॥ तरी एकची पुत्र होय त्यासी ॥ २९ ॥ जो चांडाळ गोवध करी ॥ त्यासी मिळे कर्कशा नारी ॥
वृषभ वधितां निर्धारीं ॥ शत मूर्ख पुत्र होय त्यासी ॥ ३० ॥ उदक तृणाविण पशु मारित ॥ तरी च-
मुक्या प्रजा होती समस्त ॥ जो पतिव्रतेसी भोगूं इच्छित ॥ तरी कुरूप नारी कर्कशा मिळे ॥ ३१ ॥
जो पारधी बहु जीव संहारी ॥ तो फेंपरा होय संसारीं ॥ गुरुत्याग जो चांडाळ करी ॥ तो उपज-
तांचि मृत्यु पावे ॥ ३२ ॥ नित्य अथवा रविवारीं स्त्रीसुते रविसमोर ॥ त्याचे बाळपणीं दंत भग्न के
श शुभ्र ॥ जे मृत बाळासाठीं रुदती निर्धार ॥ त्यांस हांसतां निपुत्रिक होय ॥ ३३ ॥ हरिणी म्ह
णे व्याधा लागुन ॥ मी सत्वर येते पतीस भोग देऊन ॥ न येई तरी हीं पापें संपूर्ण ॥ माझ्या माथां
बैसोत पैं ॥ ३४ ॥ व्याध मनांत शंकोन ॥ म्हणे धन्य धन्य तुमचें ज्ञान ॥ सत्वर येईं गृहास जाऊन
॥ सत्य संपूर्ण सांभाळीं ॥ ३५ ॥ जलपान करूनि वेगीं ॥ आश्रमा गेली ते कुरंगी ॥ तो मृगराज-
तें च प्रसंगीं ॥ जलपानार्थ पातला ॥ ३६ ॥ व्याधें ओढिला बाण ॥ तो मृग बोले दीनवदन ॥ म्हणे

माझ्यास्त्रियापतिव्रतासगुण॥त्यासीपुसोंनियेतोंमी॥३७॥शपथऐकेंत्वरित॥कीर्त्तन-
करितीप्रेमळभक्त॥तोकथारंगमोडितांनिर्वंशहोत॥तेंपापसत्यममसाथां॥३८॥ब्रह्मक
र्मवेदोक्त॥शूद्रनिजांगेंआचरत॥तोअधमनरकींपडत॥परधर्मआचरतां॥३९॥तीर्थयात्रे-
सीविघ्नेंकरी॥वाटपाडीवस्त्रद्रव्यहरी॥तरीसर्वांगींव्रणअघोरीं॥नरकींपडेकल्पपर्यंत॥४०॥
शास्त्रकोशींनाहींप्रमाण॥कूटकविताकरीक्षुद्रलक्षुन॥हरितीब्राह्मणाचामान॥तरीसंतत
ननयांचेंनवाढे॥४१॥हरिदिनींशिवदिनींउपोषण॥विधियुक्तनकरीद्वादशीपूर्ण॥तरीह-
स्तपादक्षीण॥होतीत्याचेनिर्धारें॥४२॥एकशिवहरिप्रतिमाफोडिती॥एकभगवद्भक्तां
विघ्नकरिती॥एकशिवमहिमाउच्छेदिती॥नरकींहोतीकिटकते॥४३॥मातृद्रोहीत्यांसी
व्याधीभरे॥पितृद्रोहीपिशाचविचरे॥गुरुद्रोहीतत्काळमरे॥भूतप्रेतगणींविचरेतो॥४४
विप्रआहारबहुतजेविती॥त्यांसजोहांसेदुर्मती॥त्याचेमुखींअरोचकरोगनिश्चिती॥न
सोडीतोजन्मवरी॥४५॥एकगोविक्रयकरिती॥एककन्याविक्रयअर्जिती॥तेनरमार्जार-
मस्तहोती॥बाळेंभक्षितीआपुलीं॥४६॥जोकन्याभगिनीअभिलाषी॥जोकामदृष्टीपा
हेपतिव्रतेसी॥प्रमेहरोगहोयत्यासी॥कींरवडागुह्यांतदाटत॥४७॥प्रासादभंगलिंगभंग
करी॥देवाचींउपकरणेंअलंकारचोरी॥देवप्रतिष्ठाअव्हेरी॥पंडुरोगहोयतेथें॥४८॥एकमि

त्रद्रोहविश्वासघातकरिती ॥ मातृपितृहत्यागुरूसीसंकटींपाडिती ॥ ब्रह्मवधगोवधनवारि
ती ॥ आंगींसामर्थ्यअसोनियां ॥ ४९ ॥ ब्राह्मणबैसवोनिबाहेरी ॥ उत्तमान्नजेवितीगृहांतरीं
॥ सोयऱ्याचीप्रार्थनाकरी ॥ संग्रहणीपोटींशूळहोतीतयां ॥ १५० ॥ एककर्मभ्रष्टपंचयज्ञक
रिती ॥ एकब्राह्मणांचींसदनेंजाळिती ॥ एकदीनासीमार्गींनागविती ॥ एकसंतांचाकरिती
अपमान ॥ ५१ ॥ एककरितीगुरुछळण ॥ एकह्मणतीपाहूंयाचेंलक्षण ॥ नानादोषआरो
पितीअज्ञान ॥ त्यांचेंसंताननवाढे ॥ ५२ ॥ जोसदापितृद्वेषकरी ॥ जोब्रह्मवृंदासीअव्हेरी
॥ शिवकीर्तनऐकतांत्रासेअंतरीं ॥ तरीपितृवीर्यजनव्हेतो ॥ ५३ ॥ शिवकीर्तनींनव्हेसादर
॥ तरीकर्णमूळरोगनिर्धार ॥ नसत्याचगोष्टीजल्पेअपार ॥ तोदर्दुरहोयनिर्धारें ॥ ५४ ॥
शिवकीर्तनकिंवापुराणश्रवण ॥ तेथेंशयनकरितांसर्पहोयदारुण ॥ एकअतिवादकछ-
ळकजाण ॥ तेपिशाचयोनीपावती ॥ ५५ ॥ एकादेवार्चनींवीटयेत ॥ ब्राह्मणपूजावयाकंटाळ
त ॥ तीर्थप्रसादअव्हेरित ॥ त्यांच्याआंखुडतीअंगशिरा ॥ ५६ ॥ मृगह्मणेऐसीपापेंअपार ॥
ममपस्तकींहोईलपरमभार ॥ मगपारधीह्मणेसत्वर ॥ जाईंस्वस्थानामृगवर्या ॥ ५७ ॥ व्या
धशिवनामेंगर्जेतेक्षणीं ॥ कंठसद्गदितअश्रुनयनीं ॥ मागुतीबिल्वदळेंखुडोनीं ॥ शिवावरी
टाकीतसे ॥ ५८ ॥ चौप्रहरांच्यापूजाचारी ॥ संपूर्णझाल्याशिवजागरीं ॥ सप्तजन्मींचीपापेंभि

धरीं ॥ मुळींहूनी भस्मजाहली ॥ ५९ ॥ तोंपूर्वेदिशासुखप्रक्षालित ॥ रूपणीग्रजउदयपावत ॥ आरक्तवर्णशोभादिसत ॥ तेंकुंकमप्राचीचें ॥ ६० ॥ तोंतिसरीमृगीआलीअकस्मात ॥ व्याधदेखिलाकृतांतवत ॥ ह्मणेंमारूंनकोमजयथार्थ ॥ बाळासीस्तनदेऊनियेत्येंमी ॥ ६१ ॥ व्याधअत्यंतहर्षभरित ॥ ह्मणेहीकायबोलेलशास्त्रार्थ ॥ तोऐकावयाह्मणत ॥ शपथकरूनि-जायतूं ॥ ६२ ॥ यावरीमृगीह्मणेव्याधाऐक ॥ जोतृणदाहकग्रामदाहक ॥ गोब्राह्मणाचेंकोंडीउदक ॥ क्षयरोगत्यासीनसोडी ॥ ६३ ॥ ब्राह्मणाचींसदनेंहरितीदेख ॥ त्यांचेंपूर्वजरौरवींपडतीनिःशंक ॥ मातृपुत्राविघडीएक ॥ स्त्रीपुरुषांतविघडपाडिती ॥ ६४ ॥ देवब्राह्मणदेखोन ॥ खालतीनकरितीकदामान ॥ निंदितीबोलतीकठोरवचन ॥ यमकरचरणछेदीतयांचे ॥ ६५ ॥ परवस्तुचोरावयादेख ॥ अखंडलाविलाअसेरोंख ॥ साधुसन्मानेंमनींदुःख ॥ त्यांसीनेत्ररोगतिडकानसोडिती ॥ ६६ ॥ पुस्तकचोरतेमुकेहोती ॥ रत्नचोराचेनेत्रजाती ॥ अत्यंतगर्वीतेमहिषहोती ॥ पारधीनिश्चितश्येनपक्षी ॥ ६७ ॥ भक्तांचीजोनिंदाकरित ॥ त्याचेमुखींदुर्गंधीघाणित ॥ जोमातापितयांसीताडित ॥ लुलाहोयतयालागीं ॥ ६८ ॥ जोअत्यंतकृपण ॥ धननवेचीअणुप्रमाण ॥ तोमहाभुजंगहोउन ॥ धुसधुसीतबैसेतेथें ॥ ६९ ॥ भिक्षेसीयतीश्वरआला ॥ तोजेणेंरितादवडिला ॥ शिवत्यावरीजाणकोपला ॥ संततीसंपत्तीहोयदग्ध ॥ ७० ॥ ब्राह्मणबैसलापा-

त्रावरी ।।उठउनिघातलाबाहेरी ।।त्याहूनियांदुराचारी ।।दुसराकोणीनसेची ।।७१।।ऐसा
धर्माधर्मऐकोन ।।पारधीसद्गदबोलेबचन ।।स्वस्थछाजाईंजलपानकरून ।।बाळासीस्तनदे
ऊनियेईं ।।७२।।ऐसेंऐकोनिमृगीलवलाह्या ।।गेलीजलपानकरूनियां ।।बाळेंस्तनींलावूनि
यां ।।तृप्तकेलींतियेनें ।।७३।।वडीलजाहलीप्रसूत ।।दुसरीपतीचीकामनापुरवित ।।मृग
राजह्मणेआतांत्वरित ।।जाऊंचलाव्याधापासीं ।।७४।।मगपाडसांसहितसर्वही ।।व्या
धापासींआलींलवलाहीं ।।मृगह्मणेतेसमयीं ।।आधींमजवधींपारधिया ।।७५।।मृगीह्म
णेहानव्हेविधी ।।आह्मींजाऊंपतीच्याआधीं ।।पाडसेंह्मणतीत्रिशुद्धी ।।आह्मासीवधीं
पारधियां ।।७६।।त्यांचींवचनेंऐकतांतेक्षणीं ।।व्याधसद्गदझालामनीं ।।अश्रुधारालोट
ल्यानयनीं ।।लागेचरणींतयांच्या ।।७७।।ह्मणेधन्यजिणेंमाझेंझालें ।।तुमचेनिमुखेंनि
रूपणऐकिलें ।।बहुतांजन्मींचेंपापजळालें ।।पावनकेलेंशरीर ।।७८।।मातापितागुरुदेव ।।
तुह्मीचआतांमाझेंसर्व ।।कैचासंसारमिथ्याभाव ।।पुत्रकलत्रसर्वलटिकें ।।७९।।व्याधबो
लेसप्रेमेंकरून ।।आतांमीकधींशिवपदपावेन ।।तोंअकस्मातआलेंविमान ।।शिवगणबैस
लेत्यावरी ।।८०।।पंचवदनदशभुज ।।व्याघ्रांबरनेसलेमहाराज ।।अद्भुततयांचेंतेज ।।दिक्
चक्रामाजीनसमाये ।।८१।।दिव्यवाद्येंवाजविती किन्नर ।।आलापकरितीविद्याधर ।।दिव्यसु

मनाचे संभार ॥ सुरगण स्वयें वर्षती ॥ ८२ ॥ मृगें पावलीं दिव्य शरीर ॥ व्याध करी साष्टांग नमस्कार ॥ मुखें म्हणे जय जय हरहर ॥ तों शरीर भाव पालटला ॥ ८३ ॥ परिसीं झगटतां लोह होय सुवर्ण ॥ तैसा व्याध झाला दशभुज पंचवदन ॥ शिवगणीं बहुत प्रार्थून ॥ दिव्य विमानीं बैसविला ॥ ८४ ॥ मृगें पावलीं दिव्य शरीर ॥ तीं ही विमानीं आरूढलीं समग्र ॥ व्याधाची स्तुति वारंवार ॥ करिती सुरगण सर्व ही ॥ ८५ ॥ व्याध नेला शिवपदाप्रती ॥ तारामंडळीं मृगें राहतीं ॥ अद्यापि गगनीं झळकती ॥ जन पाहती सर्व डोळां ॥ ८६ ॥ सत्यवती हृदयरत्नखाणी ॥ रसभरित बोलिला लिंगपुराणीं ॥ तें सज्जन ऐकोत दिनरजनीं ॥ ब्रह्मानंदें करोनियां ॥ ८७ ॥ धन्य तें शिवरात्रीव्रत ॥ श्रवणें पातकें दग्ध होत ॥ जे हें पठण करी सावचित्त ॥ धन्य पुण्यवंत नर तेची ॥ ८८ ॥ सज्जन श्रोते निर्जर सत्य ॥ प्राशन करोत शिवलीलामृत ॥ निंदक असुर कुतर्की बहुत ॥ त्यांस प्राप्त केंवि हें ॥ ८९ ॥ कैलासनाथ ब्रह्मानंद ॥ तयाचें पदकल्हार सुगंध ॥ तेथें श्रीधर अभंग षट्पद ॥ रुंजी घालित शिवनामें ॥ ९० ॥ ॥ शिवलीलामृत ग्रंथ प्रचंड ॥ स्कंदपुराण ब्रह्मोत्तर खंड ॥ परिसोत सज्जन अखंड ॥ द्वितीयोऽध्याय गोड हा ॥ ११९ ॥ ॥ श्रीसांबसदाशिवार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥जयजयशिवमंगळधामा॥निजजनहृदयआरामा॥चराचरफलांकितद्रुमा॥नामाअनामातीततूं॥१॥इंदिरावरभगिनीमनरंजना॥षडास्यजनकाशफरीध्वजदहना॥ब्रह्मानंदाभाळलोचना॥भवभंजनात्रिपुरांतका॥२॥हेशिवसद्योजातवामदेवघोरा॥तत्पुरुषाईशानईश्वरा॥अर्धनारीनटेश्वरा॥गिरिजारंगागिरीशा॥३॥गंगाधराभोगिभूषणा॥सर्वव्यापकाअंधकमर्दना॥परमातीतानिरंजना॥गुणत्रयविरहिततूं॥४॥हेपयःफेनधवलाजगज्जीवन॥द्वितीयाध्यायींकृपाकरून॥अगाधस्कंदरसआख्यान॥शिवरात्रीमहिमावर्णिला॥५॥यावरीकैसीकथेचीरचना॥वदवीपंचमुखपंचानना॥शौनकादिकांमुनिजना॥सूतसांगेनैमिषारण्यीं॥६॥इक्ष्वाकुवंशींमहाराज॥मित्रसहनामेंभूभुज॥वेदशास्त्रसंपन्नसतेज॥दुसराबिडौजापृथ्वीवरी॥७॥पृतनावसनेंकरून॥धातलेंउर्वीसिपालाण॥प्रतापसूर्यउगवलापूर्ण॥शत्रुभगणेंमावळलीं॥८॥तोएकदामृगयाव्याजेंकरून॥निघालाधुरंधरचमूघेउन॥घोरांदरप्रवेशलाविपिन॥तोंसावजेंचहूंकडोनउठलीं॥९॥व्याघ्रसूकरीसवनकरी॥मृगमृगीवनगौवानरवानरी॥शशकजंबुकांच्यामारी॥संहारितनृपवर॥१०॥चातकमयूरबदक॥कस्तूरीकुरंगगवादिबिडालक॥नकुलराजहंसचक्रवाक॥पक्षीश्वापदेंधावतीं॥११॥नृपेंमारिलेजीवबहुवस॥त्यांतएकमारिलाराक्षस॥

क्षस॥महाभयानकतामस॥गतप्राणहोऊनिपडियेला॥१२॥त्याचाबंधुपरमदारुण॥
तोपाहताझालादुरोन॥मनींकापट्यकल्पून॥ह्मणेसूडघेईनबंधूचा॥१३॥मित्रसहपात
ळास्वनगरास॥असुरेंधरिलामानववेष॥कृष्णावसनवेष्टितविशेष॥दर्वीस्कंधींयेऊनियां॥
१४॥नृपासीभेटलायेउन॥ह्मणेमीसूपशास्त्रींपरमनिपुण॥अन्नशाकासुवासिककरीन॥दे
खोनसुरनरभूलती॥१५॥रायेंठेविलापाकसदनीं॥त्यावरीपितृतिथीलक्षुनी॥गुरुवशि
ष्ठधरालागुनी॥नृपश्रेष्ठेंआणिला॥१६॥भोजनाआलाब्रह्मनंदन॥तोंराक्षसेंकापट्यस्मरू
न॥शाकांतनरमांसशिजवून॥ऋषीसआणूनवाढिलें॥१७॥त्रिकाळज्ञानीवशिष्ठमुनी॥
सकळऋषींमाजींशिरोमणी॥कापट्यसकळजाणुनी॥मित्रसहशापिला॥१८॥ह्मणेतूंव
नींहोयराक्षस॥जेथेंआहारनमिळेनिःशेष॥मीब्राह्मणमजनरमांस॥वाढिलेंकेसेंपापिया॥१९
रावह्मणेमीनेणेंसर्वथा॥बोलावासूपशास्त्रीजाणता॥तोंतोपळालाक्षणनलागतां॥गुरु
रूपेंवनाआपुल्या॥२०॥रावकोपलादारुण॥मजशापिलेंकायकारण॥मीहीतुजशापीन-
ह्मणोन॥उदककरींघेतलें॥२१॥तंवरायाचीपट्टराणी॥मदयंतीनामेंपुण्यखाणी॥रूपेंकेव
ळलावण्यहारिणी॥चातुर्यउपमेजेविशारदा॥२२॥मदयंतीह्मणेराया॥दूरदृष्टीपाहेंविचा
रूनियां॥शिष्येंगुरूसीशापावया॥अधिकारनाहींसर्वथा॥२३॥गुरूसीशापदेतांनिर्धारीं॥

शिव अ.
२ ३

आपणनरकभोगावेकल्पवरी॥रावह्मणेचतुरसुंदरी॥बोललीससाचतें॥२४॥ह्मणेंहेंउद
करवालींटांकूंजरी॥तरीपीकनपिकेदग्धहोयधरत्री॥मगआपुल्याचप्रपदावरी॥जलटाकी
मित्रसहा॥२५॥तोंजानुपर्यंतचरण॥दग्धझालेकृष्णवर्ण॥कुष्ठेंभरलामगतेथुन॥कल्म
षपादनामत्याचें॥२६॥वशिष्ठेंजाणोनिवृत्तांत॥रायासीउःशापदेत॥ह्मणेद्वादशवर्षां
हींहोसीलमुक्त॥येसीस्वस्थानाआपुल्या॥२७॥गुरुपावलाअंतर्धान॥मगकल्मषपाद
राक्षसहोउन॥क्षुधाक्रांतनिशिदिन॥वनींभक्षीसर्वजीव॥२८॥परमभयानकअसुर॥
विशाळदेहकपाळींशेंदुर॥विक्राळवदनबाहेरशश्म॥दंतदाढावाढलिया॥२९॥जीवभक्षि
लेअसमास॥वनींहिंडतांतोराक्षस॥एकब्राह्मणकुमारडोळस॥द्वादशवर्षीदेखिला॥३०॥
सवेंत्याचीललनाचिमणी॥दोघेंक्रीडतीकौतुकेंवनीं॥तंवतोब्राह्मणपुत्रराक्षसेंधरुनीं॥भ
क्षावयासिद्धझाला॥३१॥तंवत्याचीवधूकाकुळतीयेत॥अरेतूंमित्रसहराजापुण्यवंत॥गो
ब्राह्मणप्रतिपाळक॥माझाकांतमारूंनको॥३२॥गडबडांलोळेसुंदरी॥करुणाभाकीपदरप
सरी॥सवेंचिजाऊनिचरणधरी॥सोडींझडकरीपतिमाझा॥३३॥पतीसभक्षूंनकोराजेंद्रा॥म
हत्पापेंघेऊंनकोएकसरा॥स्वर्गमार्गतरीचतुरा॥कैसापावसीअंतकाळीं॥३४॥ऐसीकरुणाभाकि
तांकामिनी॥निर्दयेंभक्षिलातेचिक्षणीं॥अस्थिपंजरटाकुनी॥तियेपुढेंदीधला॥३५॥

२

तंवतीदुःखेंकरुनी ॥ आक्रोशेंकपाळपिटीधरणी ॥ मृत्तिकाघेऊनिघालीवदनीं ॥ कोणवनीं सांवरीतीतें ॥ ३६ ॥ मगतिणेंशापदिधलारायातें ॥ जोअलोटविधिहारिहरांतें ॥ ह्मणेमदयंती- संगरूरतें ॥ प्राणजाईलतेचक्षणीं ॥ ३७ ॥ कोणेएकेस्त्रियेचासंगसोहळा ॥ तुजनघडोरेचां डाळा ॥ ऐसाशापवदोनितेवेळां ॥ केल्यागोळाअस्थिपतीच्या ॥ ३८ ॥ तात्काळप्रवेशलीअ- ग्नी ॥ इकडेद्वादशवर्षीशापमुक्तहोउनी ॥ रावस्वनगरायेऊनी ॥ वर्तमानसांगेस्त्रियेसी ३९ येरीकपाळपिटीआक्रोशेंकरून ॥ ह्मणेझालेंवंशखंडण ॥ पतीसह्मणेब्रह्मचर्यधरून ॥ प्रा णआपुलारक्षींकां ॥ ४० ॥ अनिवारअत्यंतमन ॥ नकरीकोणेस्त्रियेसींसंभाषण ॥ खदिरांगा रांचीसेजआजपासोन ॥ झालीतुजलागींजाणपां ॥ ४१ ॥ परमतळमळीराजेंद्र ॥ जैसासांप- ळांकोंडिलाव्याघ्र ॥ कींमहाभुजंगाचेदंतसमग्र ॥ पाडोनिगारुडीदीनकरी ॥ ४२ ॥ कींनासिकीं वेसणघालून ॥ महावृषभकरितीदीन ॥ कींवनींनिरंकुशवारण ॥ धरूनिक्षीणकरितीमग ॥ ४३ ॥ तैसाकल्मषपादभूप ॥ होऊनिराहिलादीनरूप ॥ पुढेंप्रकाशावयाकुळदीप ॥ आपणधर्म शास्त्रपहातसे ॥ ४४ ॥ तेथींचेंपाहोनिप्रमाण ॥ वशिष्ठेंमदयंतीसभोगदेउन ॥ अमोघवीर्यपड तांपूर्ण ॥ दिव्यपुत्रजाहला ॥ ४५ ॥ तेणेंपुढेंवंशचालिला ॥ असोतोरावमृगयेसनिघाला ॥ यथा रण्यतथागृहवाटेनृपाळा ॥ भोगत्यजिलेसर्वही ॥ ४६ ॥ मनांतमनोजविकारउठत ॥ विवेकांकु

शेंकामदभआवरित॥जेणेंस्त्रीसवैधव्यमजमृत्य॥तेंकर्मसहसानकरावें॥४७॥आपुली-
कर्मगतीगहन॥प्राक्तनविचित्रदारुण॥देवावरीकायबोलठेउन॥भोगिल्याविणेंनसुटेची
॥४८॥ऐसारावउदासयुक्त॥वनींहिंडतांमागेंपाहत॥तोंभयानकपिशाचअत्यंत॥राया-
पाठीउभेसदा॥४९॥दंपत्येंपूर्वीमारिलीं॥तीब्रह्महत्यापाठीसलागली॥राजातीर्थेंहिंडतांस
कळी॥परीकदाकाळीनसोडी॥५०॥नसोडीस्वप्नींजागृतींत॥महाविक्राळदांतकरकरांखा
त॥रायेंव्रतेंकेलींबहुत॥दानदेतबहुसाल॥५१॥ऐसाहिंडतांरावभागला॥मिथुळानगरास
मीपआला॥वनश्रीदेखतांआनंदला॥परीब्रह्महत्यापाठीसीउभी॥५२॥वृक्षलागलेबहुत
॥आम्रवृक्षफळभारेंडोलत॥पोफळीरातांजनविराजित॥केळीनारळीखर्जूरिया॥५३॥चंप
कजाईजुईमालती॥मोगरेपुन्नागरायशेवंती॥मलयागरकृष्णागरजाती॥जपाकरवीरको
विदार॥५४॥वडपिंपळऔदुंबर॥पारिजातकबकुळदेवदार॥कपित्थबिल्वअंजिर॥अर्जुन
पिचुमंदकदंबते॥५५॥ऐसियावनामाजीनृपती॥क्षणएकपावलाविश्रांती॥परीतेपाठीसी
पापमती॥ब्रह्महत्याउभीअसे॥५६॥तोंउगवलाभाग्यवासरमणी॥कींनिधानजोडलेंरंका
लागुनी॥कींक्षुधितापुढेंउचंबळोनी॥क्षीराब्धिजैसापातला॥५७॥कींमरतियाच्यामु
खांत॥अकस्मातघातलेंअमृत॥कींचिंताग्रस्तासीप्राप्त॥चिंतामणीजाहला॥५८॥ऐं

सातापसियांमाजीं मुगुटमणी ॥ शिष्यमांदीसवें घेउनी ॥ महाराजतपस्वी गौतममुनी ॥
तयेस्थानीं पातला ॥ ५९ ॥ रायें घातलें लोटांगण ॥ दाटला अष्टभावें करून ॥ उभाठाकला कर
जोडुन ॥ करी स्तवन प्रीतीनें ॥ ६० ॥ सहजहोतां संतदर्शन ॥ पापें संहारती संपूर्ण ॥ तूं विलोकिसी
जरी कृपाकरून ॥ तरी रंक सहस्रनयन होय ॥ ६१ ॥ यावरी तो महाराज गौतम ॥ कल्मषपादा
पुसे कुशलक्षेम ॥ राज्य राष्ट्र प्रजा अमात्यक परम ॥ स्वरवें करून नांदती कीं ॥ ६२ ॥ ब्राह्मणक्ष
त्रियवैश्यशूद्र ॥ स्वधर्म आचरती कीं समग्र ॥ पशु सेवक पुत्र कलत्र ॥ समस्त सुस्वरूप आहे
तकीं ॥ ६३ ॥ राव म्हणे आपुले कृपेकरून ॥ समस्त आहेत क्षेमकल्याण ॥ परंतु आलासी वाट
तें दुरून ॥ आनंदघन दिसतोसी ॥ ६४ ॥ तुझ्या दर्शनें मज वाटे सत्वर ॥ ब्रह्महत्या दूर होईल
समग्र ॥ मग पूर्वकर्म आपुलें दुस्तर ॥ ऋषीप्रती निवेदिलें ॥ ६५ ॥ गौतम म्हणे परमपवित्र ॥
भूकैलास गोकर्णक्षेत्र ॥ तेथूनि मी आलों अपार ॥ महिमा तेथींचा न वर्णवे ॥ ६६ ॥ ओंकारस्व
पें कैलासनाथ ॥ भवानीसहित तेथें नांदत ॥ सुरअसुरकिन्नरसेवित ॥ अर्धमात्रा पीठ जें ६७
त्या गोकर्णींचें शिवदर्शन ॥ ब्रह्मादिकां दुर्लभ जाण ॥ तेथें इंदिरेसहित जनार्दन ॥ तपगहन आ
चरित ॥ ६८ ॥ कोटिसूर्यांची प्रभा ॥ मृडानीसहित शिव उभा ॥ कैवल्यगर्भींचा पूर्णगाभा ॥ ते
थिंची शोभा न वर्णवे ॥ ६९ ॥ इंद्र सनकादिक ब्रह्मपुत्र ॥ तेथें वसती अहोरात्र ॥ जेथींचे पा

षाणतरुवर॥ समग्रनिर्जर अवतरले॥ ७०॥ सत्यवतीहृदयरत्न॥ जेथेंकरीअनुष्ठान॥ वशिष्ठभृगुजमदग्न॥ गोकर्णक्षेत्रींसदावसती॥ ७१॥ पाहावयामृडानीनायक॥ मंडप घसणीहोतसेदेख॥ नारदतुंबरगायक॥ जेथेंगातीशिवलीला॥ ७२॥ गोकर्णाभोंवतेंस मग्र॥ उभेअखंडदेवांचेभार॥ मुखेंगर्जतीशिवहरहर॥ आनंदथोरहोतसे॥ ७३॥ ऋषीक रितीवेदघोष॥ अप्सरनायिकांचेंनृत्यविशेष॥ किन्नरगंधर्वगायकसुरस॥ तोषवितीमहेशा तें॥ ७४॥ तेंअतिउत्तमस्थान॥ तेजोमयप्रकाशगहन॥ नानावृक्षलागलेसघन॥ कैलासभु वनप्रत्यक्ष॥ ७५॥ शुभ्रसिंहासनलखलखित॥ चारीद्वारेंमणिमयखचित॥ ऐरावतारूढअ मरनाथ॥ पूर्वद्वारींतिष्ठतसे॥ ७६॥ दक्षिणेरक्षीसूर्यनंदन॥ पश्चिमेसीवारुणीरमण॥ उत्तरेसी वैश्रवण॥ प्राणमित्रशिवाचा॥ ७७॥ कर्पूरगौरभवानीसहित॥ धवधवीततेजेंविराजित॥ भू कैलाससाक्षांत॥ माहेरसंतसाधकांचें॥ ७८॥ त्यामूर्तिचिंकरावेंध्यान॥ त्याभोंवतेंमहासिद्धी- चेंपूजन॥ त्याभोंवतेंकात्यायनीआवरण॥ अष्टभैरवपूजिजे॥ ७९॥ द्वादशमित्रएकादशरु- द्र॥ तेथेंचवसतीअहोरात्र॥ अष्टवसूदिक्पालसमग्र॥ जोडोनिकरउभेतेथें॥ ८०॥ अष्टसिद्धी नवनिधीकरजोडोनी॥ अखंडआराधितीपिनाकपाणी॥ रायासीह्मणेगौतममुनी॥ मीहीवस तोंसदातेथें॥ ८१॥ वरकडक्षेत्रींलक्षवरुषेंजाण॥ तपआचरतांनिर्वाण॥ गोकर्णीएकदिन॥

होयप्रसन्नसदाशिव ॥ ८२ ॥ अमावास्यासंक्रांतीसोमवार ॥ प्रदोषपर्वकाळशिववासर ॥ समुद्रस्नानकरितांसमग्र ॥ फळहोयसकळतीर्थांचें ॥ ८३ ॥ रावणाकुंभकर्णबिभीषणा ॥ त्यांहीं पूर्वीकेलेंतेथेंअनुष्ठान ॥ तेंनिर्वाणलिंगदशाननेंजाण ॥ कैलासाहूनिआणिलें ॥ ८४ ॥ गणेशेंस्थापिलेंतेंलिंग ॥ ऋषीह्मणतीसूताते कथासांग ॥ ऐकावयालीलास्फुरंग ॥ श्रवणें वाटपाहती ॥ ८५ ॥ यावरीसूतवक्तानिपुण ॥ रावणमातेसीकैकसीअसेअभिधान ॥ तीनित्यलिंगपूजनावीणजाण ॥ उदकप्राशननकरीच ॥ ८६ ॥ पंचधान्याचेंपिष्टकरून ॥ लिंगकरीकामनाधरून ॥ व्हावेंरावणाचेंकल्याण ॥ जयसंपूर्णप्राप्तव्हावा ॥ ८७ ॥ शक्रेंतिचेंलिंग नेउन ॥ समुद्रींटाकिलेंद्वेषेंकरून ॥ त्यालागींरात्रदिन ॥ रावणमाताअन्ननघे ॥ ८८ ॥ रावणह्मणे मातेलागुन ॥ मीमुख्यआत्मलिंगआणितोंजाउन ॥ कैलासाप्रतिद्विपंचवदन ॥ जाताझालासाक्षेपें ॥ ८९ ॥ तपआचरलादारुण ॥ जोचतुःषष्टिकळाप्रवीण ॥ जेणेंवेदांचींखंडेंकरून ॥ सारासार निवडिलें ॥ ९० ॥ चतुर्दशविद्यापारंगत ॥ शिवासीआवडेअत्यंत ॥ दशमुखेंगायनअद्भुत ॥ केलेंत्याणेंस्वामीपुढें ॥ ९१ ॥ आपुलेंशिरछेदूनिस्वहस्तें ॥ शिरांच्यातांतीकरूनस्वरयुक्त ॥ दशमुखगातांप्रेमभरित ॥ उमानाथसंतोषेजेणें ॥ ९२ ॥ रागउपरागभार्यासहित ॥ मूर्छनाशरीरकंपित ॥ सप्तस्वरतालसंगीत ॥ शास्त्रप्रमाणगातसे ॥ ९३ ॥ गद्यपद्यरचनानानाकळा ॥

गीतप्रबंधअखंडनाममाळा॥गातांप्रीतीनेंशिवलीला॥शंभूतोषलाअद्भुत॥९४॥ह्मणेप्र-
सन्नझालोंदशमुखा॥इच्छितमागतुजप्रियजेंकां॥दशकंठह्मणेकामांतका॥आ-
त्मलिंगमजदेंई॥९५॥यात्रिभुवनांतजेंसुंदर॥ऐसीललनादेईंसुकुमार॥ऐकोनिसंतोषला
कर्पूरगौर॥भोळाउदारचक्रवर्ती॥९६॥कोटिचंद्रसूर्यांचीप्रभापूर्ण॥ऐसेंलिंगकाढिलेंहृद
यांतुन॥कींब्रह्मानंदरससमुरोन॥दिव्यलिंगवोतिलें॥९७॥सहस्त्रबालसूर्यनपावतीसरी॥ऐ
सीप्रभापडलीदशदिशांतरीं॥दिधलेंरावणाचेकरीं॥जेंअतर्क्यब्रह्मादिकां॥९८॥जेंमुनि
जनाचेंध्येयध्यान॥जेंसनकादिकाचेंदेवतार्चन॥वेदशास्त्रपुराण॥दिव्यलिंगवर्णिती॥
९९॥जेंत्रिगुणातीतपरब्रह्म॥जेंअजअजितअनाम॥सच्चिदानंदनिर्वाणधाम॥योगीआ
रामपावतीजेथें॥१००॥अनंतब्रह्मांडेंविचित्रें॥जेणेंरचिलीं इच्छामात्रें॥ज्याकारणेंभांड
तीवेदशास्त्रें॥तेंदिव्यलिंगपुरातन॥१॥तेंलिंगरावणेंहातीं घेउन॥ह्मणेहेत्रिलोचनत्रि
दोषशमन॥लावण्यसागरींचेंनिधान॥त्रिभुवनसुंदरललनादे॥२॥जीअपर्णेचीअपर
प्रतिमा॥ऐसीदेईंमजसर्वोत्तमा॥सच्चिदानंदापूर्णब्रह्मा॥नामानामातीततूं॥३॥शिवह्म
णेइचाप्रतिमाविशेष॥निर्मूंनशकेविधीश॥भोळाचक्रवर्तीमहेश॥ह्मणेहेचिनेईंअपर्णातूं
४॥रावणेंअवश्यह्मणोनी॥स्कंधींघेतलीस्कंदजननी॥दिव्यलिंगहातींघेउनी॥लंकानाथचालि

ला॥५॥दक्षिणपंथेंजातांसत्वर॥गजबजिलेसकळसुरवर॥गजाननस्कंदवीरभद्र॥नंदिके
श्वरतळमळती॥६॥ह्मणतीहेसदाशिवत्रिनयन॥हेंकेसेंतुझेंउदारपण॥भवानीबैसलासी
देउन॥पंचवदनहांसतसे॥७॥ह्मणोतियेचाकैवारीवैकुंठनाथ॥तोधांवेलआतांस्नेहभरित॥
इकडेभवानीस्तवनकरित॥हेपद्मजतातधांववेगीं॥८॥वारिजनयनइंदिरावरा॥निगमागम
वंद्यासुहास्यवक्त्रा॥हेनीलपयोधरगात्रा॥धांववेगींसोडवीमज॥९॥हेमधुकैटभनरकसुर
भंजना॥हेदशावतारधरापीतवसना॥हेमदनांतकमानसरंजना॥हेजनार्दनाजगद्गुरो १०
हेकोटिमनोजतातश्रीधर॥असुरमर्दनपरमउदार॥ऐसेंस्तवनऐकतांसर्वेश्वर॥विप्ररूपेंआ
डवाआला॥११॥ह्मणेधन्यधन्यहेपंचवदना॥कोठेंमेळविलीऐसीललना॥दशमुखह्मणे
हेअपर्णा॥सदाशिवेंदीधली॥१२॥विप्रह्मणेखालींउतरून॥न्याहाळूनपाहेंइचेंवदन॥
रावणपाहेतंवतेकुलक्षण॥अत्यंतकुरूपदेखिली॥१३॥भवयांसआठीअमंगळपूर्ण॥वृद्ध
गालबैसलेदंतहीन॥गदगदांविप्रहांसेदेखोन॥टाकोनिरावणचालिला॥१४॥मगरमाधवें
तयेस्थळीं॥स्थापिलीमाताभद्रकाळी॥इकडेअसुरशिवाजवळी॥ह्मणेस्त्रीअमंगळकैसी
दीधली॥१५॥शिवह्मणेसत्यवचन॥तीतुजनावडेपेकोणाळिणा॥अनंतब्रह्मांडेंदावुन॥
सवेंचिलपवीलतत्वतां॥१६॥मगश्रीधरेंआंगींचीमळीकाढून॥स्वहस्तेंनिर्मिलीरूपसंपन्न॥

मयासुराचेउदरींजाण॥ उत्पन्नझालीतेचपैं॥१७॥तिच्यास्वरूपाचीप्रती॥नाहींनाहींत्रिज- गतीं॥अंगाच्यासुवासेंधांवती॥काद्रवेयचक्रेंप्रीतीनें॥१८॥तिचेंनाममंदोदरी॥जीचीप्रति मानाहींउर्वीवरी॥विंशतिनेत्राचेचत्वरीं॥पट्टमहिषीपतिव्रता॥१९॥मयासुरकरीलकन्यादान ॥वरीएकशक्तीदेईलआंदण॥सप्तकोटीमंत्रांचेंगहन॥सामर्थ्यअसेजियेमाजीं॥२०॥तेनि- र्वाणसांगातीणशक्ती॥तुजप्राप्तहोईललंकापती॥महाशत्रूवरीनिर्वाणींतीं॥प्रेरावीत्वांस त्यपैं॥२१॥ऐसेंऐकतांचिरावण॥परतलालिंगघेउन॥पूर्वस्थळासीआलाजाण॥तोंगजान नगाईराखी॥२२॥गजाननाचेंस्तवन॥देवकरितीकरजोडून॥ह्मणतीदिव्यलिंगसोडवून॥ स्थापीअक्षयगणपती॥२३॥ऐसादेवींप्रार्थिलाएकदंत॥तंवरावणासीमूत्रलागलेंबहुत॥ पुढेंपाउलनघालवत॥चरफडीतमूत्रभरें॥२४॥भूमीवरीलिंगनठेवावें॥ऐसेंपूर्वींसांगी- तलेंउमाधवें॥हातींघेऊनिलघुशंकेसबसावें॥हेंहीकर्मअनुचित॥२५॥तंवतोसिद्धिबु द्धीचादाता॥विप्रवेषेंगाईराखतां॥त्यासीलंकानाथह्मणेतत्वतां॥लिंगहातींधरीहें॥ २६॥विप्रह्मणेलंकापती॥माझ्यागाईरानोरानींपळती॥तुझ्यामूत्रशंकेसवेळकिती॥ला गेलहेंनकळेमज॥२७॥रावणह्मणेनलगतांक्षण॥येतोंमूत्रशंकाकरून॥विप्रह्मणेतीनवे- ळांबाहीन॥नयेसीतरीलिंगटाकीनभूमीवरी॥२८॥अवश्यह्मणेलंकापती॥लिंगदेतविप्रा-

च्याहातीं॥ दूरजाऊनएकांतक्षिती॥ लघुशंकेसबैसला॥ २९॥ अगाधगजमुखाचेंचरित्र॥ जो साक्षातअवतरलाइंदिरावर॥ शिवउपासनाकरावयापवित्र॥ झालापुत्रशंभूचा॥ ३०॥ असो रावणासीमूत्राचेपूर॥ लोटलेनसावरतीअनिवार॥ एकघटिकालोटतांइभवक्त्र॥ हांकफो डीगर्जोनी॥ ३१॥ माझ्यागाईगेल्यादुरी॥ हें आपुलेंलिंगघेईंकरीं॥ रावणनबोलेचिनि- र्धारीं॥ हस्तसंकेतेंथांबह्मणे॥ ३२॥ दुसरीघटिकाझालीपूर्ण॥ हांकफोडीगजानन॥ ऐ- श्याघटिकाझाल्यातीन॥ तथापिरावणनउठेची॥ ३३॥ जैसेंपाखंडीयाचेंकुमत॥ नस रेंचिवारितांपंडित॥ तैसेंरावणाचेंमूत्रनसरेसत्य॥ पुनःएकदंतहांकफोडी॥ ३४॥ राक्ष- साआपुलेंलिंगसांभाळीं॥ ह्मणोनिठेविलेंभूमंडळीं॥ अक्षयस्थापिलेंकदाकाळीं॥ ब्रह्मा दिकांउपडेना॥ ३५॥ पृथ्वीसहितअभंग॥ एकचिझालेंदिव्यलिंग॥ रावणधांवेसवेग॥ अशौ चअपवित्रक्रोधभरें॥ ३६॥ लिंगउपडितांडळमळीकुंभिनी॥ महाबळेंदशमुखपाहेउपडो- नी॥ परीनउपडेतयालागुनी॥ अखंडअभंगजाहलें॥ ३७॥ गुप्तझालागजानन॥ गाईपृथ्वी तजातीलपोन॥ रावणेंएकगाईचाकर्ण॥ धांवोनियांधरियेला॥ ३८॥ तोहीनउपडेतयाला गुन॥ मगतेथेंचकेलेंलिंगपूजन॥ गोकर्णमहाबळेश्वरतेथोन॥ नामजाणपडियेलें॥ ३९॥ रा वणमातातेथेंयेउन॥ तेंनित्यकरीशिवपूजन॥ आदिलिंगहेंजाणोन॥ करितीअर्चनसुरऋ

षी॥४०॥रावणकुंभकर्णबिभीषण॥तेथेंचिकरितीअनुष्ठान॥त्याच्याबळेंकरून॥देवजिं
किलेरावणें॥४१॥मयासुरमंदोदरीआणिशक्ती॥देताझालारावणाप्रती॥लक्षपुत्रनातूग
णती॥सवालक्षजयाचे॥४२॥इंद्रजितऐसापुत्र॥अष्टादशाक्षौहिणीवाद्यभार॥जेथींच्या-
अनुष्ठानेंअपार॥रावणापावलासंपत्ती॥४३॥गौतमह्मणेराजोत्तमा॥ऐसागोकर्णीचाथोरम
हिमा॥वर्णूनशकेमधवाब्रह्मा॥येणेंआह्मातेथूनिजाहलें॥४४॥मिथिलेश्वराच्यायागाकार
णें॥आह्मीयेतअसतांत्वरेनें॥एकवर्तलेंतुजकारणें॥कथातेचिसांगतों॥४५॥एकवृक्षन्य
ग्रोधविशाळ॥त्याखालींआह्मीबैसलोंसकळ॥तोंएकचांडाळीअमंगळ॥अतिअपवित्रदे
खिली॥४६॥सर्वरोगवेष्टितपूर्ण॥जन्मांधगलितकुष्ठभरलेंजाण॥किडेपडलेसर्वांगींपूर्ण
॥दुर्गंधीउठलीचहूंकडे॥४७॥रक्तपितीभरोन॥हस्तपादबोटेंगेलींझडोन॥परमकुत्सितकु
लक्षण॥कोणेंचेंअन्नउदकतियेतें॥४८॥दंतहीनकर्णहीन॥गर्भीचचितियेचेंगेलेलोचन॥कर्णना
सिकाझडोन॥किडेपडलेबुचबुचित॥४९॥अंगींचेंचर्मगेलेंझडोन॥वस्त्रपडिलेंगळोन॥
धुळींतलोळेचांडाळिण॥पापपूर्वींचेंभोगित॥५०॥तिचामरणकाळजवळआलाजाण॥व
रतेंपाहिलेंआह्मीविलोकुन॥तोंशिवेंधाडिलेंदिव्यविमान॥तियेलागींन्यावया॥५१॥दश
भुजपंचवदन॥शिवदूतबैसलेचौघेजण॥कोटिसूर्यतेजविराजमान॥प्रभाशशिसमानए

